






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका






म. सा. प.

संपादक → वा. रा. ढवळे

११७, ११८, ११९, १२०

वर्ष ३१ वे अंक १२० जाने., फेब्रु., मार्च १९५७

वर्ष ३० वे अंक ११९ ऑक्टो., नोव्हे., डिसें. १९५६

" " अंक ११८ जुलै, ऑगस्ट, सप्टें. १९५६.

" " अंक ११७ एप्रिल, मे, जून १९५६.







महाराष्ट्र साहित्य परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

संपादक
वा. रा. ढवळे

वर्ष ३१ : अंक १२०

जानेवारी – फेब्रुवारी – मार्च १९५७

या अंकांत

म. म. वा. वि. मिराशी, डॉ. र. वि. हेरवाडकर, निशिकांत करकरे, गिरिधर पंडित, दि. के. बेडेकर, श्री. रा. टिकेकर शिवाय संपादकीय, परिषद्वार्ता साभार-स्वीकार, शुद्धलेखन परिषद वृत्तांत इत्यादि.

अनुक्रमणिका



## साभार स्वीकार

(१) संशोधन मुक्तावली (सर दुसरा) लेखक प्रा. वा वि. मिराशी. किं. ४ रुपये. प्रकाशक: मध्यप्रदेश संशोधन मंडळ, नागपूर पृष्ठें २४०

(२) Contemporary Indian Literature: Sahitya Akademi New Delhi, किं. २॥ रु. पृष्ठें ३००.

(३) हरिभाऊ (कै. हरि नारायण आपटे यांच्या सर्व उपलब्ध वाङ्मयाचा कालानुक्रमी अभ्यास: ले. डॉ. ल. म. भिंगारे प्रकाशक: स्कूल व कॉलेज बुकस्टॉल, कोल्हापूर किं. १० रु. पृष्ठें ४५६).

## नवीन सभासद

तहह्यात

१ श्री. खं. द. जोशी, जबलपूर.
२ डॉ. मा. गो. देशमुख, अमरावती.
३ श्री. भा. शं. कशाळेकर, हैदराबाद (द.)
४ श्री. वि. सी. गोडबोले, पुणें २.

साधारण

१ कु. नलिनी कृ. अळूरकर, पुणें ४.
२ प्रा. दत्ता महाजन, कानपूर.
३ श्री. द. व. माडीवाले, पुणें २.
४ प्रा. ल. के. अराबकर, मुंबई २८
५ श्री. ह. कृ. कुलकर्णी, पुणें २.
६ सौ. शुभा गुणे, जामनगर (सौराष्ट्र).
७ श्री. हे. वि. दीक्षित, पुणें २.
८ सौ. कुसुम व्यं. कुलकर्णी, पुणें २.
९ श्री. अ. ना. देशमुख, पुणें २.
१० श्री. प्र. म. जोशी, पुणें २.
११ श्री. श्री. स. गोसावी, पुणें २.

मुद्रक:--म. ना. चापेकर, आर्यसंस्कृति मुद्रणालय, १९८/१७ सदाशिव, पुणें २.
प्रकाशक:—अरविन्द मंगरूळकर, चिटणीस, महाराष्ट्र-साहित्य-परिषद्, टिळक-रस्ता, पुणें २.

७४२२

# महाराष्ट्र-साहित्य-परिषद्
## वार्षिक साधारण सभा

दि. १८।४।५७

स. न.

परिषदेची वार्षिक साधारण सभा रविवार दि. ९ जून १९५७ ला दुपारीं ५ वाजतां कार्यालयांत भरणार आहे. सभेला आपण अवश्य यावें ही विनंती.

कामें

१. दुखवटा.
२. मागील सभेचें इतिवृत्त वाचून संमत करणें.
३. १९५६-५७ चें इतिवृत्त संमत करणें.
४. १९५६-५७ चें जमाखर्च-पत्रक संमत करणें.
५. १९५७-५८ चा अर्थसंकल्प संमत करणें.
६. ठराव.
७. पत्रव्यवहार.
८. हिशेब तपासनीसांची नेमणूक.
९. अध्यक्षांच्या संमतीने आयत्या वेळीं येणारी कामें.

वा. दा. गोखले
अ. गं. मंगरूळकर
बा. रं. सुंठणकर
चिटणीस.

शं. दा. पेंडसे
अध्यक्ष,
चिं. वि. जोशी
कार्याध्यक्ष.

व अर्थसंकल्प १९५७-५८

संपादकीय
पत्रव्यवहाराचा
पत्ता :
१२६ डी. फणसवाडी,
मुंबई २.

महाराष्ट्र साहित्य परिषद्,
टिळक रस्ता, सदाशिव पेठ, पुणें २.

अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

संपादक : वा. रा. ढवळे

वर्ष ३१, अंक १२०    जानेवारी—फेब्रुवारी—मार्च १९५७



## या अंकांत



संपादकीय पत्रव्यवहाराचा पत्ता :
१२६ डी. फणसवाडी, मुंबई २.

महाराष्ट्र साहित्य परिषद्,
टिळक रस्ता, सदाशिव पेठ, पुणें २.









महाराष्ट्र साहित्य परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

संपादक : वा. रा. ढवळे

वर्ष ३१, अंक १२० जानेवारी—फेब्रुवारी—मार्च १९५७

## संपादकीय

### साहित्य अकादमीच्या सल्लागार समित्या

नुकतीच वृत्तपत्रांत पुढील बातमी वाचण्यांत आली—

" साहित्य अकादमीच्या सल्लागार समितीची येत्या मे महिन्यांत पुनर्घटना करण्यांत येणार असून प्रत्येक भाषेंतील प्रातिनिधिक साहित्य-संघटनांकडून नांवें माग-विण्यांत येतील. उदाहरणार्थ, मराठीसाठी महाराष्ट्र साहित्य परिषद्, विदर्भ-साहित्य-संघ आदि मान्यता असलेल्या संघांकडून तीन तीन नांवें मागविण्यांत येऊन, त्यांतील सर्वमान्य नांवें अकादमी निवडील असें समजतें. कांही भाषांतील साहित्य संस्थांनी तक्रारी केल्यामुळे अकादमी ही पद्धति स्वीकारणार आहे. "

( लोकमान्य, ता. ३० मार्च १९५७ ).

वरील मजकुरांतील जाड ठसा माझा आहे. साहित्य अकादमी ही राष्ट्रीय संस्था भारत सरकारने इ. स. १९५४ सालीं स्थापन केली. देशी भाषांतील विविध वाङ्मयीन चळवळींना उत्तेजन देऊन, देशी भाषांचा उत्कर्ष साधण्यासाठी त्या चळवळींचें एकसूत्रीकरण करण्याचा प्रयत्न करणें हें एक अकादमीचें उद्दिष्ट आहे. त्या दृष्टीने देशी भाषांतील उत्कृष्ट पुस्तकांची इंग्रजींत अगर हिन्दींत भाषान्तरें करणें, अगर त्या त्या भाषांतील उत्कृष्ट कथा, काव्य, लेख यांचे संग्रह करवून घेऊन त्यांचे विविध भाषांत अनुवाद करवून घेणें हेहि अकादमीचे उद्देश आहेत.

अनुक्रमणिका

साहित्य अकादमी ही एक स्वायत्त संस्था आहे. निरनिराळ्या देशी भाषा, घटक राज्यें व विद्यापीठें यांच्या प्रतिनिधींचें एक मंडळ या संस्थेचीं सूत्रें हलवीत असतें. वास्तविक या प्रतिनिधींची निवड अगदीं सुरवातीपासूनच लोकशाही पद्धतीने होणें आवश्यक होतें. ती तशी झाली असती तर कदाचित् अकादमीच्या कार्यपद्धतींत व धोरणांत इष्ट अशा सुधारणा वेळींच होऊं शकल्या असत्या. मराठी भाषेपुरतें बोलावयाचें तर गेल्या तीन वर्षांत अकादमीने विविध संग्रह व भाषान्तरें करण्यासंबंधीं जे निर्णय घेतले ते कदाचित् अधिक बिनचूक घेणें अकादमीला शक्य झालें असतें. आता कांही साहित्य संस्थांनी तक्रारी केल्यामुळे सल्लागार समित्यांवर साहित्य संस्थांनी निवडलेलेच प्रतिनिधी घेण्यांत येणार आहेत ही घोषणा करण्यांत येत आहे. इतक्या उशीराने का होईना-ही पद्धति स्वीकारण्याचें अकादमीने ठरविलें आहे ही घटना स्वागतार्हच म्हटली पाहिजे.

गेल्या तीन वर्षांत अकादमीने केलेल्या कार्याच्या तपशीलांत शिरून त्याच्या गुणदोषांची चर्चा येथे करण्याचा माझा हेतु नाही. पण पुढे मागे तशी मनमोकळी व विधायक चर्चा होणें आवश्यक आहे. विशिष्ट प्रदेश अगर विशिष्ट लेखक यांच्या हितसंबंधाची केवळ जपणूक करण्यापेक्षा मराठी भाषा व वाङ्मय यांचा विकास घडवून आणण्याची निर्भेळ (Academic) व व्यापक दृष्टि समितीवरील प्रतिनिधींनी ठेवल्यास अकादमीचें उद्दिष्ट यशस्वीरीतीने पार पडूं शकेल एवढेंच तूर्त सुचविणें इष्ट वाटतें.

अकादमीने नुकताच Contemporary Indian Literature हा चौदाहि देशी भाषांतील वाङ्मयाचा व वाङ्मयीन प्रवृत्तींचा परामर्श घेणारा एक ग्रंथ प्रसिद्ध केला आहे. यांतील सर्व लेख इंग्रजी भाषेत लिहिलेले असून त्या त्या भाषांतील मान्यवर टीकाकार लेखकांनी लिहिलेले आहेत; जवळ जवळ ३०० पानांच्या उत्कृष्ट छपाईचा हा उपयुक्त ग्रंथ अवघ्या अडीच रुपयांत अकादमीने उपलब्ध करून दिला आहे, याबद्दल अकादमी अभिनन्दनास पात्र आहे. असाच 'भारतीय कविता' हाहि एक चौदा देशी भाषांतील निवडक कवितांच्या हिन्दी अनुवादाचा संग्रह अकादमीने प्रसिद्ध केला असल्याचें कळतें.

## ग्रंथनिर्मितीला सरकारी पारितोषिकें

प्रादेशिक भाषांतील ग्रंथनिर्मितीला उत्तेजन देण्याच्या हेतूने गेलीं तीन वर्षें मुंबई सरकार रोकड रकमेची पारितोषिकें उत्कृष्ट ठरणाऱ्या ग्रंथांच्या लेखकांना देत आलें आहे. या स्पर्धेत जे प्रकाशक अगर लेखक भाग घेतात त्यांच्याच प्रकाशनांचा विचार होतो. पण जे लेखक अगर प्रकाशक या स्पर्धेपासून या नाही त्या कारणांमुळे अलिप्त राहातात त्यांचीं प्रकाशनें कितीहि उत्कृष्ट असलीं तरी तीं विचारांत घेतलीं जात नाहीत. त्यामुळे त्या पुस्तकांनाच नव्हे तर त्या भाषेतील एकंदर वाङ्मयाला अन्याय होतो. दुसरी एक विचार करण्यासारखी वस्तुस्थिति अशी की अशा प्रकारच्या पैशांच्या खैरातीने उत्कृष्ट वाङ्मयाच्या निर्मितीस खरोखरच उत्तेजन मिळतें किंवा कसें. शिवाय सरकार परीक्षक-समितींचीं नांवें अगर पुस्तक परीक्षणाच्या कसोट्या जाहीर करीत नाही. त्यामुळे मिळालेलें पारितोषिक हें त्या त्या विषयांतील तज्ज्ञांच्या कसोटीला उतरून मिळालें आहे याचें मानसिक समाधान लेखकाला लाभत नाही. तीन वर्षांच्या अनुभवानंतर या वस्तुस्थितीचा अवश्य विचार होणें इष्ट आहे. वास्तविक प्रादेशिक भाषांतील प्रातिनिधिक साहित्य संस्थांच्या सहकार्याने व

सल्ल्याने उत्कृष्ट वाङ्मय-निर्मितीस उत्तेजन देण्याचीहि योजना सरकारने आंखली पाहिजे. असें झालें तरच गुणी जनांची योग्य अशी पारख होऊं शकेल. शिवाय हीं पारितोषिकें त्या त्या प्रादेशिक भाषांच्या वार्षिक साहित्य-संमेलनांत देण्याची व्यवस्था झाल्यास लेखकांनाहि योग्य ठिकाणीं व योग्य व्यासपीठावर गौरव झाल्याचें समाधान मिळूं शकेल. या बाबतींत सरकारने जरूर तो विचार करण्यासाठी साहित्य-संस्थांच्या प्रतिनिधींची एक जोड-बैठक त्वरित बोलवावी असें मला वाटतें.

## औरंगाबादचें येतें साहित्य–संमेलन

अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचें ३९ वें अधिवेशन येत्या मे महिन्याच्या ता. ५–६–७ तारखांना मराठींतील एक प्रगत विचारसरणीचे सव्यसाची लेखक श्री. अनन्त काणेकर यांच्या अध्यक्षतेखाली भरण्याचें निश्चित झालें आहे. मराठवाड्याचा अन्तर्भाव मुंबई राज्यांत झाल्यावर तेथें भरणारें संमेलन म्हणून त्याला जसें भाषिक महत्त्व निर्माण झालें आहे त्याचप्रमाणे काणेकरांच्या सारखा विचारवन्त ललित वाङ्मयसेवक अध्यक्ष म्हणून लाभल्यामुळे त्या संमेलनाला वाङ्मयीन महत्त्वहि प्राप्त झालें आहे. भाषिक व वाङ्मयीन असें दुहेरी महत्त्व औरंगाबाद येथील अधिवेशनाला लाभत आहे हें एक त्याचें उल्लेखनीय वैशिष्ट्य होय.

आपल्या भाषा-बांधवांपासून कित्येक वर्षे विलग पडलेला मराठी मुलुख एका शासनसंस्थेच्या अधिकाराखाली पुन्हां सलग झाला हें एक मराठवाड्यांतील मराठी भाषिकांच्या उत्साहाचें कारण तर खरेंच; पण मराठवाड्यांतील एकन्दर साहित्यिक कार्यकर्ते मुळांतच उत्साही आहेत, या वस्तुस्थितीकडे दुर्लक्ष करून चालणार नाही. या संमेलनाला जोडून एक दोन शाखा-संमेलनेंहि भरविण्याचें संमेलनाच्या चालकांनी ठरविलेलें दिसतें. त्यामुळे वाङ्मय-विषयक तात्त्विक चर्चाहि रंगतील हें निश्चित. तसेंच साहित्य संस्थांचें एकत्रीकरण करून एक मध्यवर्ती प्रभावी अशी संघटना निर्माण करण्याच्या शक्यतेचा विचारहि या संमेलनांत होणार आहे. साहित्य संमेलनांनी उराशीं बाळगलेलें संयुक्त महाराष्ट्राचें स्वप्न आज पूर्णतया साकार न झाल्यामुळे वाटणारी मनांतील खंत अधिवेशनांत बोलकें स्वरूप धारण करील अशींहि चिन्हें दिसत आहेत. यामुळे यंदाचें संमेलन विशेष गाजेल अशी अपेक्षा करावयास हरकत दिसत नाही.

## संमेलनाध्यक्ष काणेकर

श्री. अनन्त काणेकर यांची साहित्य-सेवा आबालवृद्ध वाचकांना चांगलीच परिचित आहे. त्यामुळे त्यांचा परिचय नव्याने करून देण्याची आवश्यकता नाही. काव्य, कथा, रूपककथा, लघुनिबंध, एकांकिका, नाटकें, प्रवासवर्णन इत्यादि ललित साहित्याचे प्रकार त्यांनी आपल्या वैशिष्ट्यपूर्ण व विलोभनीय व्यक्तित्वाने नटविलेले आहेत. त्यांच्या या विविध साहित्यसेवेचा यथोचित परामर्श घेणारा ‘ काणेकर : व्यक्ति व वाङ्मय ’ हा श्री. अविनाश केळकर या त्यांच्याच एका शिष्याने संपादित केलेला उत्कृष्ट ग्रंथ नुकताच प्रसिद्ध झालेला आहे. ज्यांच्या जीवनांत वेळच्या वेळीं सर्व गोष्टी यथाक्रम झाल्या आहेत अशीं माणसें जगांत

फार थोडीं असतात. अशा थोड्या मंडळींत मी काणेकरांची गणना करीन. साहित्य संमेलनाचें अध्यक्षपदसुद्धा त्यांना अगदी वेळेवर म्हणजे त्यांच्या वाङ्मयाच्या वाचकांच्या व टीकाकारांच्या मनांत येतें न येतें तोंच मिळालेलें आहे. संमेलनाच्या अध्यक्षपदाचा हा मान त्यांना देऊन मराठी वाङ्मय-सेवकांनी त्यांच्या वाङ्मय-सेवेचा एका दृष्टीने जाहीर गौरवच केला आहे. या गौरवाबद्दल मी काणेकरांचें हार्दिक अभिनन्दन करतों व त्यांच्या नेतृत्वाखाली औरंगाबाद येथील संमेलन यशस्वी होईल याबद्दल मला खात्री वाटते.

## कै. पु. मं. लाड

रविवार ता. २३ मार्च १९५७ रोजीं वाङ्मयाचे एक व्यासंगी विद्वान अभ्यासक, कवि व प्रभावी वक्ते श्री. पुरुषोत्तम मंगेश लाड यांचें अगदी अकालीं व अनपेक्षितरीत्या देहावसान झालें! ज्यांचा ज्यांचा लाडांशीं प्रत्यक्ष परिचय झाला होता त्यांना ही दुःखद वार्ता ऐकून हळहळ वाटल्यावांचून राहिली नसेल! सरकारी नोकरींतील ते एक उच्च अधिकारी असल्यामुळे, त्यांनी आपलें सुरवातीचें बरेचसें लेखन 'चिकित्सक एम्. ए. (कॅंब्रिज)' या टोपण नांवानेच लिहिलें. जुन्या मराठी वाङ्मयाचा त्यांचा व्यासंग दांडगा होता. एक बुद्धिमान् विद्यार्थी म्हणून जसे ते शाळा–कॉलेजांत गाजले त्याचप्रमाणे हुषार, कल्पक व मातबर अधिकारी म्हणूनहि त्यांनी सरकार-दरबारीं विशेष लौकिक मिळविला. नोकरीव्यतिरिक्तचा सर्व वेळ ते वाङ्मयाच्या अभ्यासांत व चिन्तनांत घालवीत असत. तुकारामाच्या गाथांचें जे दोन भाग अल्प किंमतींत मराठी वाचकांना मिळूं शकले त्याचें सारें श्रेय कै. लाडांच्या परिश्रमांनाच आहे. गेलीं दोन वर्षे ते भारताच्या नभोवाणी व प्रसिद्धी खात्याचे चिटणीस होते. त्या नात्याने त्यांनी केलेली कामगिरी ही अत्यन्त मोलाची आहे. नभोवाणीवरील वाङ्मयीन व सांस्कृतिक कार्यक्रमांत जी इष्ट अशी सुधारणा झाली व त्यांचा दर्जा अनेक दृष्टींनी उंचावला त्याचें बव्हंशीं श्रेय लाडांच्या अभिजात रसिकतेलाच दिलें पाहिजे. अशा प्रकारचा एक श्रेष्ठ दर्जाचा अधिकारी, व्यासंगी विद्वान व मराठी भाषा व साहित्य यांच्या उत्कर्षासाठी लेखणी व वाणी सतत झिजविणारा हाडाचा साहित्यिक आपल्यामधून अकालीं निघून गेल्यामुळे मराठी वाङ्मयाची मोठीच हानि झाली आहे यांत शंका नाही. किंबहुना कै. लाडांच्या निधनाने भारताच्या राजधानींतील मराठी संस्कृति व मराठी वाङ्मय यांचा कैवारी नाहीसा झाला आहे याचेंच दुःख मराठी मनाला कित्येक दिवस जाचत राहील! ●●●

वा. रा. ढवळे

## सभासदांस विनंति



या वर्षी त्रैवार्षिक निवडणूक व्हावयाची आहे. त्यासाठी सभासदांच्या नवीन याद्या तयार करावयाच्या असतात. त्या शक्य तेवढ्या निर्दोष व्हाव्या म्हणून ज्या सभासदांचे पत्ते बदलले असतील त्यांनीं आपले नवीन पत्ते ३० जून १९५७ च्या आंत कार्यालयांत कळवावे. जे सभासद मृत होतात त्या सर्वांचीच माहिती कार्यालयाला असतेच असे नाही म्हणून ज्या सभासदांना कोणी सभासद मृत झाल्याची माहिती असेल तीहि माहिती त्या सभासदांनी कळवावी अशी विनंती आहे.

वा. दा. गोखले
चिटणीस.

---

म. म. प्राचार्य वा. वि. मिराशी

# भवभूति आणि उम्बेक

तर्केषु कर्कशतराः स्युरथापि पुंसां
काले भवन्ति मृदवः कवितासु वाचः ।
दैत्येन्द्रशैलकुलिशं दयिताकपोले
नाथस्य कोमलमुदाहरणं नखं नः ॥

सुभाषित.

संस्कृत वाङ्मयाच्या इतिहासांत अद्यापि समाधानकारक रीतीने न सोडविलेले जे अनेक प्रश्न आहेत त्यांपैकी संस्कृत नाटककार भवभूति आणि मीमांसक भट्ट उम्बेक [1] हे एकच किंवा भिन्न हा एक महत्त्वाचा आहे. या प्रश्नावर अनेक विद्वानांनी लिहिलें आहे आणि त्यांच्यामध्ये त्यावर तीव्र मतभेद उत्पन्न झाला आहे. भवभूति हा वैदर्भ कवि. तेव्हा मराठी वाचकांना या प्रश्नाची चर्चा महत्त्वाची वाटण्याचा संभव आहे. म्हणून ती प्रस्तुत लेखांत संक्षेपाने केली आहे.

भवभूति आणि उम्बेक हे एकच होत या मताला उपोद्बलक असा पुरावा सत्तर वर्षांपूर्वी कै. शंकर पांडुरंग पंडित यांनी वाक्पतिराजाच्या गउडवहो ( गौडवध ) नामक काव्याला जोडलेल्या प्रस्तावनेंत प्रथम मांडला. ‘ मालतीमाधव ’ हें संस्कृत नाटक भवभूतीचें म्हणून सुविख्यात आहे. त्याच्या प्रस्तावनेंत भवभूतीने आपल्या कुलाविषयी बरीच माहिती दिली आहे. त्यामध्ये तें नाटक श्रीकण्ठपदलांछन भवभूतीने लिहिलें, असें स्पष्ट विधान आलें आहे. या तऱ्हेचें विधान त्याच्या ‘ महावीरचरित ’ व ‘ उत्तररामचरित ’ या इतर दोन नाटकांतहि आढळतें. या नाटकांच्या अंकांच्या पुष्पिकांमध्ये (colophons) किंवा निदान त्यांच्या अखेरीस त्यांचा कर्ता म्हणून भवभूतीचें नांव येतें. पण कै. शं. पां. पंडित यांना मिळालेल्या ‘ मालतीमाधवा ’ च्या सुमारें पांचशे वर्षे जुन्या असलेल्या एका हस्तलिखितांत सहाव्या अंकाच्या शेवटीं भवभूतीच्या ऐवजी उम्बेकाचार्यांचें नांव नाटककार म्हणून दिलेलें आढळलें. त्या ठिकाणीं उम्बेकाचार्याला ‘ श्रीकुमारिलस्वामिप्रसादप्राप्तवाग्वैभव ’ ( ज्याला श्रीकुमारिलस्वामींच्या प्रसादाने वाग्वैभव प्राप्त झालें आहे ) असें विशेषण लावलें आहे. त्याच हस्तलिखितांत तिसऱ्या अंकाच्या शेवटीं तें नाटक भट्ट कुमारिलांच्या शिष्याने रचलें असा उल्लेख आहे. हेंच हस्तलिखित पूर्वी कै. माधव व्यंकटेश लेले यांच्या संग्रहीं होतें. [2] या हस्तलिखिताच्या पुराव्यावरून भवभूतीचें उम्बेक असें दुसरें नांव होतें व तो सुप्रसिद्ध मीमांसक कुमारिलभट्ट यांचा शिष्य होता हें मत प्रचलित झालें. कै. डॉ. रामकृष्णपंत भांडारकर यांना हे उल्लेख कुतूहलोत्पादक वाटले; पण त्यांच्या काळीं या प्रश्नाविषयी इतर कांहीच साहित्य उपलब्ध

---

१. याचें नांव अनेक ठिकाणीं उंवेक असें येतें. ‘ वबयोरभेदः ’ या न्यायाने तें उम्बेक असेंहि आढळतें. कमलशीलाच्या टीकेंत तें उवेयक असें आलें आहे. पुढें दाखविल्याप्रमाणें श्रीदेवाच्या स्याद्वादरत्नाकरांत तर त्याचें ‘ ओंवक ’ असें अपभ्रष्ट रूप आढळतें.

२. मा. व्यं, लेले, ‘ मालतीमाधवसार व विचार ’, पृ. ८४.

अनुक्रमणिका

नसल्याने त्यांनी त्याविषयी निर्णयात्मक मत दिलें नाही.[३] त्यानंतर उम्बेकाचे दोन ग्रंथ-- ( १ ) कुमारिलांच्या श्लोकवार्तिकावरची तात्पर्यटीका नामक अपूर्ण व्याख्या[४] आणि ( २ ) मंडनमिश्राच्या भावनाविवेकावरची टीका[५] हे प्रसिद्ध झाले आहेत. तसेंच शांतरक्षिताच्या तत्त्वसंग्रहावरची कमलशीलाची टीका[६], चित्सुखी[७], तिजवरील नयनप्रसादिनी टीका[८], शास्त्रदीपिकेवरील रामकृष्णाची युक्तिस्नेहप्रपूरणी सिद्धान्तचन्द्रिका टीका[९], श्रीदेवाचा 'स्याद्वादरत्नाकर'[१०] इत्यादि ग्रंथांतील उम्बेकाविषयी व त्याच्या विविध मतांविषयी आलेले उल्लेख माहीत झाले आहेत. त्यांचा अभ्यास केल्यावर विद्वानांमध्ये दोन तट पडले आहेत. म. म. कुप्पूस्वामी शास्त्री[११], गंगानाथ झा[१२], पां. वा. काणे[१३], यांच्या मतें भवभूति व उम्बेक हे एकच होत आणि उम्बेक हा कुमारिलांचा शिष्य होता. याच्या उलट डॉ. श्री. कृ. बेलवलकर यांस उम्बेक हें भवभूतीचें दुसरें नांव असेल असें वाटत नाही.[१४] डॉ. कुन्हन राजा यांनी उम्बेकाच्या श्लोकवार्तिकटीकेस जोडलेल्या आपल्या विस्तृत प्रस्तावनेंत या प्रश्नाचा सविस्तर ऊहापोह केला आहे.[१५] उम्बेक हा कुमारिलांचा शिष्य नव्हता तसेंच भवभूति व उम्बेक यांच्या ऐक्याला यत्किंचितहि प्रमाण नाही असें त्यांनी स्पष्टपणें म्हटलें आहे.[१६] असें असलें तरी त्यांच्या ऐक्यविषयीचा समज कसा उत्पन्न झाला याची त्यांनी कांहीच उपपत्ति सुचविली नाही. याप्रमाणें प्रस्तुत प्रश्न अत्यंत वादग्रस्त असल्यामुळे त्याची थोड्या बारकाईने चर्चा करणें अवश्य आहे.

चर्चेकरिता आपण दोन मुख्य प्रश्न घेऊं--(१) उम्बेक हा कुमारिलांचा शिष्य होता काय ? नसल्यास त्याचा काळ कोणता ? आणि (२) भवभूति आणि उम्बेक हे एकच किंवा भिन्न ?

### उम्बेक कुमारिलभट्टांचा शिष्य होता याबद्दल प्रमाणें

उम्बेक आणि कुमारिल यांचा गुरुशिष्यसंबंध सिद्ध करण्यासाठी पुढील प्रमाणें दिलीं जातात :

३. त्यांची मालतीमाधवाची प्रस्तावना, पृ. ८-९.
४. मद्रास युनिव्हर्सिटी संस्कृत सीरीज, नं. १३.
५. प्रिन्सेस ऑफ वेल्स् सरस्वतीभवन टेक्स्ट्स् नं. ६ ( भाग १ व २ ).
६. गायकवाड्स् ओरिएंटल सीरीज्.
७. निर्णयसागर प्रेस, पृ. २६५.
८. निर्णयसागर प्रेस, पृ. २६५.
९. निर्णयसागर प्रेस, पृ. २, १४, ३०, ४८ इत्यादि.
१०. भट्टपुत्रजयमिश्राच्या श्लोकवार्तिकटीकेला (मद्रास संस्कृत सीरीज, नं. १७) जोडलेल्या डॉ. कुन्हन राजांच्या प्रस्तावनेंतील (पृ. १२) उतारा पाहा.
११. सेकंड ओरिएंटल कॉन्फरन्स्चा रिपोर्ट, पृ. ४११.
१२. भावनाविवेकाच्या ( सरस्वतीभवन टेक्स्ट्स् ) द्वितीय भागाची प्रस्तावना, पृ. ४ पाहा.
१३. उत्तररामचरिताच्या त्यांच्या आवृत्तीची प्रस्तावना, पृ. १२-१६.
१४. भवभूतिप्रणीत उत्तररामचरिताचें मराठी भाषांतर, प्रस्तावना, पृ. २६.
१५. उम्बेकाच्या श्लोकवार्तिक टीकेच्या आवृत्तीची प्रस्तावना, पृ. ३४.
१६. श्लोकवार्तिकव्याख्या (मद्रास युनिव्हर्सिटी संस्कृत सीरीज, नं. १३), पृ. १०५-१०८.

२

(१) उम्बेक हा कुमारिलस्वामींचा शिष्य होता अशा आशयाचे दोन उल्लेख मालती-माधवाच्या एका अत्यंत प्राचीन हस्तलिखितांत आले आहेत त्यावरून हा संबंध सिद्ध होतो.

(२) विद्यारण्यांच्या 'श्रीमच्छंकरदिग्विजयां'त उम्बेक हें मंडनमिश्रांचें दुसरें नांव होतें असें खालील श्लोकांत (७, ११६) सांगितलें आहे :

उंबेक इत्याभिहितस्य हि तस्य लोकै–
रुंवेति बान्धवजनैरभिधीयमाना ।
हेतोः कुतश्चिदिह वाक् सुरुषाभिशप्ता
दुर्वाससाजनि वधूर्द्वयभारतीति ॥

(अर्थ—तो मंडनमिश्र उंवेक या नांवाने ज्ञात आहे. दुर्वासऋषीने जिला कांही कारणाने शाप दिला होता ती सरस्वती त्याची पत्नी असून तिला तिचे बांधव उंवा असें म्हणतात. तिचें उभयभारती असेंहि दुसरें नांव आहे.)

या श्लोकामध्ये उंवेक (किंवा उम्बेक) असें मंडनमिश्रांचें दुसरें नांव होतें असें म्हटलें आहे. कुमारिलभट्टांनी शंकराचार्यांस आपला शिष्य मंडनमिश्र याजकडे पाठविलें अशी कथा पूर्वोक्त शंकरदिग्विजयांत दिली आहे. उम्बेक हें मंडनमिश्रांचें दुसरें नांव असल्यास या कथेने मालतीमाधवाच्या पुष्पिकेंतील वरील विधानास पुष्टीच मिळते.

(३) उम्बेक मंडनमिश्राच्या भावनाविवेकावरील आपल्या टीकेंत 'अन्यदेव हि धात्वर्थ-सामान्यकरणात्मकम् । अन्यच्च भावना नाम साध्यत्वेन व्यवस्थितम् ॥' या कुमारिलभट्टांच्या तन्त्रवार्त्तिकांतील (पृ. ३९१) श्लोकाचा उत्तरार्ध एके ठिकाणीं (पृ. ९३) 'भट्टपादैरुक्तम्' या शब्दांनी व दुसऱ्या ठिकाणीं (पृ. ४३) 'यथोक्तं गुरुणा' अशा शब्दांनी उद्धृत करतो. त्यावरून तो कुमारिलभट्टांचा शिष्य होता असें दिसतें.

(४) उम्बेकाने श्लोकवार्त्तिकावरील आपल्या टीकेंत 'अभिचरन् श्येनेन यजेत' या श्रुतिवाक्याचें विवेचन करीत असतां भाष्यकार शबरस्वामी व वार्तिककार कुमारिलभट्ट या दोघांच्या मतांतील दोष दाखविले आहेत आणि आत्मसमर्थनार्थ

गुरोरप्यवलिप्तस्य कार्याकार्यमजानतः ।
उत्पथप्रतिपन्नस्य परित्यागो विधीयते ॥

ही रामायणांतील उक्ति उद्धृत केली आहे. उम्बेक कुमारिलभट्टांचा शिष्य असल्यास ही उक्ति उद्धृत करण्यामध्ये विशेष स्वारस्य दिसेल.

(५) उम्बेकाची श्लोकवार्तिकावरची टीका स्फोटवादस्थानकापर्यंतच सापडली आहे. त्यानंतर त्याच हस्तलिखितांत त्या ग्रंथावरची भट्टपुत्र जयमिश्राची टीका दिली आहे.[१७] तेव्हा उम्बेकाच्या निधनानंतर जयमिश्राने त्याचें श्लोकवार्तिकाच्या टीकालेखनाचें कार्य पुरें केलें असें दिसतें. भट्टपुत्र जयनाथ हा कुमारिलभट्टांचा पुत्र असावा. त्याच्या टीकेच्या अगोदर उम्बेकाची टीका लिहिली असल्यामुळे उम्बेक हा कुमारिलांचा समकालीन व शिष्य होता या मतास पुष्टि मिळते.

## वरील प्रमाणांचें परीक्षण

वरील पांच प्रमाणें उम्बेक हा कुमारिलांचा शिष्य होता हें सिद्ध करण्याकरितां पुढे केलीं जातात; पण तीं निर्णायक नाहीत हें पुढील विवेचनावरून दिसून येईल :

(१) उम्बेक हा कुमारिलांचा शिष्य होता असें स्पष्ट विधान मालतीमाधवाच्या फक्त एकाच हस्तलिखितांत आढळलें आहे व तें हस्तलिखितहि सुमारें ५०० वर्षांपेक्षा जुनें नाही.

१७. ही टीका आता मद्रास युनिव्हर्सिटी संस्कृत सीरीज नं. १७ मध्यें छापली आहे.

भवभूतीच्या या किंवा इतर नाटकांच्या कोणत्याहि अन्य हस्तलिखितांत असें विधान नाही. उम्बेकाचें मालतीमाधवाचें कर्तृत्व संशयास्पद आहे हें पुढे दाखविलें आहे. तेव्हा या प्रमाणावर विशेष भिस्त ठेवतां येत नाही.

(२) शंकरदिग्विजय हा ग्रंथ उम्बेकानंतर कित्येक शतकांनी रचलेला. त्यांतील अनेक कथा कपोलकल्पित असल्याचें सिद्ध झालें आहे. उदाहरणार्थ, शंकराचार्यांकडून पराभव पावल्यानंतर मंडनमिश्राने संन्यासाश्रम घेऊन सुरेश्वर हें नांव धारण केलें ही त्यांतील कथा अविश्वसनीय ठरली आहे.[१८] तेव्हा मंडनमिश्र व उम्बेक हे एकच आणि म्हणून उम्बेक हा कुमारिलभट्टांचा शिष्य होय हें त्यांतील विधान निःसंदेहपणें स्वीकारतां येत नाही.

( ३ ) उम्बेकाने अनेक ठिकाणीं कुमारिलभट्टांच्या मतांचा उल्लेख केला आहे. पण तसें करतांना बहुतेक सर्व ठिकाणीं त्यांचा वार्त्तिककार असाच निर्देश केला आहे. एका ठिकाणीं त्यांना ' भट्टपाद ' असें म्हटलें आहे. त्यावरून त्याचा कुमारिलांविषयी फक्त आदर व्यक्त होतो, गुरुशिष्यसंबंध दाखविला जात नाही. फक्त एकाच ठिकाणीं ( भावनाविवेकावरील टीकेंत, पृ. ४३ ) त्यांच्या मताचा उल्लेख करतांना ' तदुक्तं गुरुणा ' असें म्हटलें आहे. कदाचित् कुमारिलभट्ट मंडनमिश्राचे गुरु असतील, म्हणून मंडनमिश्राच्या ग्रंथाचें व्याख्यान करतांना उम्बेकाने त्याच्या गुरूचें वचन ' तदुक्तं गुरुणा ' अशा शब्दांनी उद्धृत केलें असावें. कुमारिलभट्ट हे उम्बेकाचे स्वतःचे गुरु असते तर श्लोकवार्त्तिकावरील आपल्या टीकेच्या आरंभीं त्याने तसा निर्देश केला असता. पण तसा निर्देश त्या टीकेच्या आरंभींच काय पण इतरत्र कोठेहि त्याने केला नाही. डॉ. कुन्हन राजा यांच्या मतें तर ' तदुक्तं गुरुणा ' हा पाठ संशयास्पद आहे. भावनाविवेकाच्या उम्बेककृत टीकेचीं आणखी हस्तलिखितें सापडल्यास त्यांत दुसरा पाठ सापडेल असें त्यांस वाटतें. तें कसेंहि असलें तरी केवळ एका ठिकाणच्या पाठावरून कुमारिलभट्ट व उम्बेक यांचा गुरुशिष्यसंबंध निर्विवादपणें सिद्ध झाला असें म्हणतां येत नाही.

याच्या उलट, उम्बेकाच्या श्लोकवार्त्तिक व भावनाविवेक यांवरील टीकांचा सूक्ष्म अभ्यास केल्यास तो टीकाकार केवळ कुमारिलभट्टांनंतरच नव्हे, तर मंडनमिश्रानंतरहि कांही काळाने होऊन गेला असें स्पष्ट दिसून येईल.

कुमारिलभट्टांनी श्लोकवार्त्तिकाच्या निरालम्बनवादप्रकरणांत स्वप्नदर्शन, रज्जुसर्प, गन्धर्वनगर इत्यादि ठिकाणची भ्रान्ति निरालम्बन असते काय, या प्रश्नाची चर्चा करतांना पांच श्लोक लिहिले आहेत ( श्लो. १०९-११३ पाहा ). त्या श्लोकांचें व्याख्यान केल्यावर उम्बेकाने अन्य टीकाकारांचें मत ' अन्ये तु आलम्बनकथनपरत्वेन श्लोकपञ्चकं व्याचक्षते । ' अशा शब्दांत देऊन नंतर त्याचें खंडन केलें आहे. त्यावरून उम्बेक कुमारिलभट्टांचा साक्षात् शिष्य नसून त्या दोघांमध्ये बराच काळ गेला होता आणि त्या काळांत श्लोकवार्त्तिकावर अन्य टीकाहि लिहिल्या गेल्या होत्या असें स्पष्ट दिसतें.

उम्बेकाने केवळ कुमारिलभट्टांच्या श्लोकवार्त्तिकावरच टीका लिहिली असें नाही. त्याने मंडनमिश्रांच्या भावनाविवेकावरहि टीका लिहिली आहे. या टीकेचें बारकाईने वाचन केलें असतां मंडनमिश्र व उम्बेक एकच, हें विद्यारण्यांचें मत चूक आहे असें स्पष्ट दिसतें.[१९] मूळ ग्रंथाला मंगलश्लोक नाही, पण उम्बेकाचार्यांच्या टीकेच्या आरंभीं

१८. म. म. डॉ. काणे यांचा रॉयल एशियाटिक सोसायटीच्या मुंबई शाखेच्या जर्नल- (न्यू सीरीज्, पु. ३, पृ. २८९-२९३) मधील लेख पाहा.

१९. डॉ. राजा यांची श्लोकवार्त्तिकव्याख्येच्या आवृत्तीस जोडलेली प्रस्तावना, पृ. १८-२० पाहा.

यस्य स्फुरन्ति युगपत् सकलाः पदार्था
यश्चैक एव जगदारभते समग्रम् ।
तस्मै जगत्त्रयनताय महेश्वराय
कृत्वा नमः क्रियत एष मया प्रबन्धः ॥

असा मंगलश्लोक आढळतो. त्यावरूनहि मूळ ग्रंथकार व टीकाकार एक नव्हत, हें स्पष्ट दिसतें. इतकेंच नव्हे तर, टीकेवरून उम्बेक मंडनमिश्रानंतरहि कांही काळाने होऊन गेला असेंहि सिद्ध होतें. उम्बेकाने अनेक ठिकाणीं भावनाविवेकाचे भिन्न भिन्न पाठ देऊन चर्चा केली आहे. तेव्हा तो व मंडनमिश्र हे भिन्न होते एवढेंच नाही तर, त्या दोघांमध्यें बऱ्याच मोठ्या कालाचें व्यवधान होतें आणि त्या कालांत त्या ग्रंथाच्या अनेक प्रती झाल्यामुळे पठन-पाठनांत बरेच पाठभेद उत्पन्न झाले होते हें उघड आहे.

(४) उम्बेकाने 'गुरोरप्यवलिप्तस्य' इत्यादि श्लोक भाष्यकार शबरस्वामींच्या मताचें खंडन केल्यावर घातला आहे. त्यापूर्वीचे त्याचे श्लोक असे आहेत—"श्येनादीनां तु न साक्षान्नाप्युपचारेण नापि तत्फलस्यानर्थत्वमिति तस्यानर्थत्वप्रतिपादनपरं 'श्येनो वज्र इषुः' इत्येवमादि भाष्यमुपेक्षणीयम् ।" तेव्हा 'गुरोरप्यवलिप्तस्य' इत्यादि रामायणांतील श्लोक उद्धृत करतांना 'भाष्यकार शबरस्वामी व श्लोकवार्त्तिककार कुमारिलभट्ट यांसारख्या पूज्य आचार्यांच्या मतांचें खंडन करतांना माझ्याकडून मर्यादातिक्रम होत नाही, कारण त्यांचीं मतें चूक आहेत,' असें त्यास सुचवावयाचें आहे. त्यावरून तो कुमारिलभट्टांचा शिष्य होता असें सिद्ध होत नाही.

(५) जयनाथ हा कुमारिलभट्टांचा पुत्र होता, याला प्रमाण नाही. तोहि स्वतःच्या टीकेंत वार्त्तिककाराच्या अन्य टीकाकारांच्या मतांचा उल्लेख व खंडन करतो; त्यावरून तो वार्त्तिककार कुमारिलभट्टांनंतर कांही काळाने होऊन गेला हें उघड आहे. 'भट्टपुत्र' हें विशेषण प्राचीन काळीं ब्राह्मणांच्या नांवामागे लावण्याचा प्रघात होता, हें अनेक कोरीव लेखांवरून दाखवितां येतें. उदाहरणार्थ, पालनृपति प्रथम महीपाल याच्या बनगढ ताम्रपटांतील अनेक ब्राह्मणांच्या नांवामागे 'भट्टपुत्र' हें विशेषण लावलेलें आढळेल.[२०] जबलपूर जिल्ह्यांतील तिगोवा येथील गुप्तकालीन मंदिरांत नंतर कोरलेला एक लेख आहे. त्यांत 'भट्टपुत्र उमदेवा'चा निर्देश आहे. तेव्हा, 'भट्टपुत्र' या विशेषणावरून जयमिश्र हा कुमारिलभट्टांचा पुत्र होता हें सिद्ध होत नाही. त्याची टीका उम्बेकाच्या टीकेनंतर लिहिलेली एका हस्तलिखितांत दिसते. पण एवढ्यावरून जयमिश्र उम्बेकानंतर लागलीच झाला असें सिद्ध होत नाही. अशा जोड टीकांचीं इतरहि कांही उदाहरणें डॉ. राजा यांनी जयमिश्राच्या शर्करिका टीकेला लिहिलेल्या प्रस्तावनेंत दिलीं आहेत. अर्थातच या प्रमाणावरून उम्बेक हा कुमारिलभट्टांचा शिष्य होता असें अनुमान करणेंहि शक्य नाही हें उघड आहे.

येथपर्यंत उम्बेक हा कुमारिलभट्टांचा शिष्य होता, हें सिद्ध करण्याकरितां पुढे केलेलीं प्रमाणें कशीं निर्बल आहेत हें दाखविलें. आता उम्बेकाच्या कालाच्या पूर्वापरमर्यादा निश्चित करूं.

अन्तःप्रमाणें—उम्बेकाने श्लोकवार्त्तिकावरील टीकेंत अनेक प्रतिपक्षीयांच्या मतांचा उल्लेख केला आहे.[२१] तथापि त्यांपैकी बहुतेकांचे निर्देश द्वैतवादी, अद्वैतवादी, आत्मा-

२०. एपिग्राफिया इंडिका, पु. १४, पृ. ३२८.
२१. डॉ. राजा यांची श्लोकवार्त्तिकव्याख्येला जोडलेली प्रस्तावना, पृ. ५०–५१.

अनुक्रमणिका

द्वैतवादी, ज्ञानाद्वैतवादी, याज्ञिक, शाक्य, क्षपणक, माध्यमिक अशा सामान्य रूपाचे आहेत, त्यामुळे उम्बेकाच्या कालनिर्णयाला त्यांची कांहिहि मदत होत नाही. वैयक्तिक उल्लेख भर्तृमित्र, भर्त्रीश्वर, सांख्यनायक माधव, उपवर्ष, वृत्तिकार व दिङ्नाग यांचे आले आहेत. त्यांपैकी उपवर्ष, वृत्तिकार व दिङ्नाग हे फार प्राचीन ग्रंथकार असल्यामुळे त्यांच्या निर्देशाचाहि या बाबतींत कांही उपयोग होत नाही. भर्तृमित्र हा कुमारिलभट्टांहून प्राचीन होता हें पार्थसारथि-मिश्राच्या तद्विषयक उल्लेखावरून अनुमानितां येतें. भर्त्रीश्वर व सांख्यनायक माधव यांच्या-विषयी कांहीच माहिती नाही. तेव्हा उम्बेकाच्या कालनिर्णयास अन्तःप्रमाणांची फारशी मदत होत नाही. भावनाविवेकावरील त्याच्या टीकेंत अनेक पाठांचा उल्लेख असल्यामुळे तो मंडन-मिश्रांनंतर निदान पन्नास-पाउणशें वर्षांच्या आंत झाला नसावा. मंडनमिश्रांचा काळ सामान्यतः इ. स. ७०० ते ७२५ असा धरला जातो. तेव्हा उम्बेकाच्या कालाची पूर्वमर्यादा सुमारें इ. स. ७७५ धरावयास हरकत नाही.

आता आपण बाह्य प्रमाणांकडे वळूं. उम्बेक हा फार मोठा मीमांसक होऊन गेला. एका प्राचीन पारंपरिक श्लोकांत म्हटलें आहे–

उम्बेकः कारिकां वेत्ति तन्त्रं वेत्ति प्रभाकरः ।
वामनस्तूभयं वेत्ति नोभयं वेत्ति रेवणः ॥

कांही ठिकाणीं 'मण्डनस्तूभयं वेत्ति' असाहि पाठ प्रचलित आहे. असो; उम्बेकाचीं मतें अनेक ग्रंथकारांनी उल्लेखिलीं आहेत. त्यांमध्यें बौद्ध तत्त्वज्ञ शांतरक्षिताच्या तत्त्वसंग्रह नामक ग्रंथाचा टीकाकार कमलशील हा कालक्रमानें पहिला आहे. तत्त्वसंग्रहाच्या एका श्लोकांत वेद हे पौरुषेय आहेत असें प्रतिपादिलें आहे.[२२] या श्लोकावर व्याख्या करतांना कमलशीलाने उवेयक नामक ग्रंथकाराचें मत देऊन त्यावर टीका केली आहे. वेद हे अपौरुषेय व स्वतःप्रमाण आहेत असें मीमांसकांचें मत आहे. कुमारिलभट्टांनी हें मत श्लोकवार्तिकाच्या शब्दपरिच्छेदप्रकरणांत प्रतिपादिलें आहे. त्यावर उम्बेकाची व्याख्या आहे. तथापि कमल-शीलाने आपल्या टीकेंत उवेयकाचें म्हणणें जितकें सविस्तर दिलें आहे तितकें उम्बेकाच्या श्लोकवार्तिकावरील व्याख्येंत दिसत नाहीं. उम्बेकाहून भिन्न असा उवेयक नामक दुसरा कोणी ग्रंथकार कुमारिल व कमलशील यांच्या मधील काळांत झालेला माहीत नाही. तेव्हा उवेयक हें उम्बेकाचेंच लेखकाच्या प्रमादाने झालेलें अपभ्रष्ट रूप असावें.[२३] तसें असल्यास उम्बेकाचा वेदांचें अपौरुषेयत्व व स्वतःप्रामाण्य सिद्ध करणारा दुसरा एखादा ग्रंथ असावा असें वाटतें. कमलशील हा शांतरक्षिताचा शिष्य असून तो इ स. ८००–८२५ ह्या काळांत होऊन गेला. तेव्हा उम्बेक त्यापूर्वी इ. स. ७७५ ते ८०० या काळांत झाला असावा.

यानंतर श्रीदेवाच्या स्याद्वादरत्नाकरांत उम्बेकाच्या मताची चर्चा आहे. श्रीदेव ख्रिस्तो-त्तर ११०० च्या सुमारास होऊन गेला. यापुढील उल्लेख चित्सुखाचार्यांच्या तत्त्वप्रदीपिका किंवा चित्सुखी या ग्रंथांत पुढीलप्रमाणे आला आहे. 'उक्तं चैतदुम्बेकेन... यथाऽङ्गुल्यग्रे हस्तियूथशतमास्ते तत्रार्थव्यभिचारः स्फुट इति ।' (एखाद्याने आपणांस असें सांगितलें की अंगुलीच्या टोकावर हत्तींचे शंभर कळप राहिले आहेत तर तो आप्त किंवा सामान्यतः यथार्थवक्ता

२२. तत्त्वसंग्रह (गायकवाड्स् ओरिएंटल सीरीज्) भाग २, स्वतःप्रामाण्य प्रकरण पाहा.

२३. 'उम्बेक' नांवाचें 'ओंवक' असें अपभ्रष्ट रूप श्रीदेवाच्या स्याद्वादरत्नाकरांत आढळतें असें डॉ. राजांनी दाखविलें आहे. जयमिश्राच्या श्लोकवार्तिकटीकेची प्रस्तावना, पृ. १२ पाहा.

अनुक्रमणिका

असला तरी त्याचें म्हणणें खरें असणें शक्य नाही, हें उघड आहे असें उम्बेकाने म्हटलें आहे.) चित्सुखाचार्य खिस्तोत्तर तेराव्या शतकांत होऊन गेले. यानंतर पार्थसारथिमिश्राच्या शास्त्रदीपिका ग्रंथावरील युक्तिस्नेहप्रपूरणी सिद्धान्तचन्द्रिकानामक टीकेंत रामकृष्णाने उम्बेकाचे अनेक उतारे दिले आहेत ते सर्व आता त्याच्या श्लोकवार्तिकव्याख्येंत सापडतात हें डॉ. राजांनी दाखविलें आहे. हा रामकृष्ण उत्कल ( ओरिसा ) देशाधिपति प्रतापरुद्र गजपति याच्या दरबारीं होता असें त्याच्या टीकेंतील प्रास्ताविक श्लोकांवरून दिसतें. प्रतापरुद्राने सुमारें इ. स. १४९७ ते १५३९ पर्यंत राज्य केलें. तेव्हा सोळाव्या शतकांतहि उम्बेकाच्या ग्रंथाचा प्रचार होता असें दिसतें.

वरील विवेचनावरून उम्बेक हा इ. स. ७७५ ते ८०० या काळांत होऊन गेला असें दिसून येईल.

### भवभूति आणि उम्बेक एकच काय ?

आता आपण 'भवभूति आणि उम्बेक हे एकच किंवा भिन्न ?' हा प्रश्न घेऊं.

भवभूति हा सुमारें इ. स. ७०० च्या सुमारास होऊन गेला हें राजतरंगिणींतील उल्लेख व इतर प्रमाणें यांवरून सिद्ध झालें आहे. तेव्हा तो इ. स. ७७५ नंतर होऊन गेलेल्या उम्बेकाचा समकालीन असणें शक्य नाही हें उघड आहे; तथापि त्याचें उम्बेकाशीं ऐक्य प्रतिपादणाऱ्या प्रमाणांचा विचार केला पाहिजे. तीं प्रमाणें येणेप्रमाणें:—

भवभूति आणि उम्बेक यांच्या एकत्वाचीं प्रमाणें

( १ ) मालतीमाधवाच्या सुमारें पांचशे वर्षें जुन्या असलेल्या हस्तलिखितांत तें नाटक उम्बेकाने लिहिलें असें म्हटलें आहे. त्या नाटकाच्या प्रस्तावनेवरून तें भवभूतीने रचलें यांत संशय नाही. म्हणून भवभूति व उम्बेक हे एकच होत.

( २ ) उम्बेकाने श्लोकवार्तिकावरील आपल्या तात्पर्यटीकेच्या आरंभीं

ये नाम केचिदिह नः प्रथयन्त्यवज्ञां
जानन्ति ते किमपि तान् प्रति नैष यत्नः ।
उत्पत्स्यतेऽस्ति मम कोऽपि समानधर्मा
कालो ह्ययं निरवधिर्विपुला च पृथ्वी ॥

हा श्लोक घातला आहे. हाच श्लोक मालतीमाधवाच्या प्रस्तावनेंत आला आहे. भवभूति आपल्या श्लोकांची स्वतःच्या नाटकांत अनेकदा पुनरुक्ति करतो. तेव्हा त्याने मालतीमाधवांतला श्लोक श्लोकवार्तिकावरील आपल्या टीकेच्या आरंभीं दिला असल्यास आश्चर्य नाही. म्हणून उम्बेक व भवभूति हे एकच होत.

( ३ ) चित्सुखाचार्यांच्या तत्त्वप्रदीपिकेंत ( निर्णयसागर प्रत, पृ. २६५ ) पुढील उतारा आला आहे :

तस्माच्छाब्दं शब्दविज्ञानादसंनिकृष्टे बुद्धिरिति लक्षणमलक्षणम् । तथा आप्तवाक्यं शब्दप्रमाणमिति नैयायिकानामपि ।

आप्तोदीरितवाक्येषु मालतीमाधवादिषु ।
व्यभिचारान्न तद्युक्तमाप्तत्वस्यानिरुक्तितः ॥

स्वकपोलकल्पितमालतीमाधवादिवाक्येषु प्रामाण्याभावादतिव्याप्तिः । न हि पुरा 'आप्त एव सन् नाटकनाटिकादिप्रबन्धविरचनमात्रेणानाप्तो भवति भवभूतिः । उक्तं चैतदुम्बेकेन— 'यदाप्तोऽपि कस्मैचिदुपदिशति न त्वयाननुभूतार्थविषयं वाक्यं प्रयोक्तव्यम् । यथा अङ्गुल्यग्रे

हस्तियूथशतमास्ते इति । तत्रार्थव्यभिचारः स्फुटः ॥ ( नैयायिक शब्दप्रमाण मानतात. त्यावर चित्सुखाचार्यांची ही टीका आहे. शब्दप्रमाणाची व्याख्या 'आप्तवाक्यं शब्दः' अशी नैयायिक करतात. शब्द म्हणजे आप्तांचें वचन. वस्तूचें यथार्थ ज्ञान देणाऱ्यास आप्त म्हणतात. नैयायिकांचें हें प्रमाण मानल्यास अतिव्याप्तिदोष येतो. भवभूति शास्त्रपारंगत असल्याने त्याचे शास्त्रीय ग्रंथ शब्दप्रामाण्याखालीं येऊं शकतील. पण मालतीमाधवादि नाटक-नाटिका त्यानेच रचल्या असल्याने त्याहि प्रमाण मानाव्या लागतील. पण हीं नाटकें स्वकपोलकल्पित किंवा काल्पनिक आहेत हें सर्वांस माहीत आहे. शास्त्रीय ग्रंथ रचणारा भवभूति आप्त आणि नाटकें रचणारा मात्र अनाप्त असें म्हणतां येणार नाही. उम्बेकानेहि म्हटलें आहे की आप्तसुद्धा 'ज्याचा स्वतःला अनुभव नाही असें कांहीं सांगू नये,' असाच उपदेश करतात. उदाहरणार्थ, ( अमक्याच्या ) अंगुलीच्या टोकावर हत्तीचे शंभर कळप राहतात असें सांगू नये, कारण त्यांतील असत्यता स्पष्ट दिसेल. )

चित्सुखीवरील नयनप्रसादिनी टीकेंत या उताऱ्यावर खालील टीप दिली आहे— भवभूतिरुम्बेकः । एतदेव ग्रन्थान्तरस्थेन तद्वचनेन संमतयति । ( भवभूति हाच उम्बेक होय. वर जें म्हटलें आहे त्याच्याच म्हणजे भवभूतीच्या अन्य ग्रंथांतील वचनावरून समर्थित करतात— 'उक्तं चैतदुम्बेकेन' या शब्दांनी. ) तेव्हा भवभूति व उम्बेक हे एकच होत.

## वरील प्रमाणांचें परीक्षण

आता आपण वरील प्रमाणांचें परीक्षण करूं :

( १ ) पहिल्या प्रमाणाबद्दल मागे सविस्तर विवेचन केलें आहे. भवभूतीच्या नाटकांच्या अनेक हस्तलिखितांचा पुरावा दूर सारून केवळ एका हस्तलिखितांतील विधानावर विश्वास ठेवणें योग्य नाही. भवभूति स्वतःच्या ग्रंथांत आपलें उम्बेक असें नांव देत नाही, तसेंच उम्बेकहि आपल्या टीकांत कोठेहि आपला भवभूति नांवाने निर्देश करीत नाही. इतरांचा पुरावा या बाबतींत काय कामाचा ?

शिवाय भवभूति हा विदर्भांतील ब्राह्मण होता. त्याच्या पूर्वजांचीं महाकवि, गोपाल, नीलकंठ हीं नांवें तत्कालीन महाराष्ट्रीय ब्राह्मणांच्या नांवांसारखीं आहेत. याच्याउलट उम्बेक हें नांव द्राविड देशांतील आहे हें स्पष्ट दिसतें. या नांवांतील भिन्नतेवरूनहि भवभूति व उम्बेक भिन्न वाटतात.

( २ ) श्लोकवार्त्तिकावरच्या उम्बेकाच्या तात्पर्यटीकेचे फक्त एकच अपूर्ण हस्तलिखित आजपर्यंत सापडलें आहे. तें सध्या मद्रासमध्ये अड्यारच्या लायब्ररींत आहे. त्यावरून पं. एस्. के. रामनाथशास्त्री यांनीं त्याचा कांहीं भाग ( पृ. १-३८४ ) संपादिला व बाकीचा ( पृ. ३८५-४७४ ) डॉ. कुन्हन राजांनी तयार केला. हा ग्रंथ मद्रास विश्वविद्यालयाच्या संस्कृत ग्रंथमालेंत ( क्र. १३ ) सन १९४० मध्ये प्रसिद्ध झाला आहे. या ग्रंथाला डॉ. राजांनी विस्तृत प्रस्तावना जोडली आहे. तींत ते म्हणतात—"हें हस्तलिखित अत्यंत जीर्ण स्थितींत आहे, त्याच्या पहिल्या पृष्ठाचा वरचा भाग नष्ट झाला आहे, त्यामुळे आरंभींची एक ओळ पूर्णपणें गेली आहे. दुसऱ्या व तिसऱ्या ओळींतील कांहीं अक्षरेंहि नष्ट झालीं आहेत. 'ये नाम केचिदिह नः' इत्यादि श्लोक आता मुळीच दिसत नाही. त्यांतील अक्षरांची संख्या पाहतां तो पहिल्या ओळींत आला असणें अशक्य नाही खरें, पण तो तेथे आला असेल असें वाटत नाही—कारण ( १ ) तो श्लोक या टीकेच्या आरंभीं अनुरूप वाटत नाही. भवभूति विद्वान् व शास्त्रपारंगत होता. असा गृहस्थ नाटकें लिहूं लागला तर लोक त्याला हसतील. हीच गोष्ट

भवभूतीच्या बाबतींत घडली असावी. त्याने महावीरचरित लिहिल्यावर विद्वानांत त्याची मानखंडना झाली असावी. म्हणून त्याने त्यानंतरच्या मालतीमाधव नाटकांत आपल्या टीकाकारांस 'ये नाम केचिदिह नः प्रथयन्त्यवज्ञाम्' इत्यादि शब्दांत उत्तर दिलें आहे. त्या नाटकांत तो श्लोक प्रसंगानुरूप आहे. पण भवभूति व उम्बेक हे एकच असल्यास श्लोकवार्तिकावरील टीकेच्या आरंभीं तो योग्य दिसत नाही. कारण, त्यासारख्या शास्त्रीय ग्रंथ लिहिणाऱ्याची लोकांत अवज्ञा कशी होईल ? ( २ ) हा श्लोक त्या टीकेच्या आरंभीं आला असल्यास त्यापूर्वी अवश्य असलेल्या मंगल-श्लोकाला तेथे ( पहिल्या ओळींत ) पुरेशी जागा राहत नाही. उम्बेकाने भावनाविवेकावरील आपल्या टीकेच्या आरंभीं 'यस्य स्फुरन्ति युगपत् सकलाः पदार्थाः' इत्यादि मागे उद्धृत केलेला श्लोक दिला आहे. त्यावरून तो आपल्या ग्रंथारम्भीं मंगलश्लोक घालीत असे, हें स्पष्ट आहे." वरील दोन कारणांवरून 'ये नाम केचिदिह नः' इत्यादि श्लोक श्लोकवार्तिकावरील उम्बेकाच्या टीकेच्या आरंभीं होता काय याविषयी डॉ. राजा यास संशय वाटतो. त्या टीकेचें एकच हस्तलिखित व तेंहि जीर्ण अवस्थेंत सांपडलें असल्याने या बाबतींत निश्चित विधान करणें अशक्य आहे. तथापि वरील श्लोक त्या हस्तलिखितांत होता असें मानलें तरी तो तेथे अननुरूप असल्याने तो मूळचा उम्बेककृत नसून भवभूति व उम्बेक हे एकच होत असें मानणाऱ्या कोणा लेखकाने समासांत ( मार्जिनमध्यें ) लिहिला असावा व नंतर तो टीकेंत शिरला असें अनुमान डॉ. राजा यांनी केलें आहे. ते पुढे म्हणतात—"तो श्लोक तेथे उम्बेकाने घातला होता असें मानलें तरी त्यावरून त्याचें भवभूतीशीं ऐक्य प्रस्थापित होत नाही. कारण, (१) इतर कांही लेखकांप्रमाणें त्यानें तो आपल्या पूर्वीच्या (भवभूतीच्या ) मालतीमाधवांतून घेतला असेल. (२) उम्बेक हा मोठा मीमांसक होता, पण भवभूति मीमांसक नसून वेदान्ती होता. त्याने आपल्या नाटकांत परमहंस ज्ञाननिधि नामक गुरूचा आदरपूर्वक निर्देश केला आहे. तसेंच विवर्तादि वेदान्ताच्या संज्ञा योजिल्या आहेत, त्यांवरूनहि हें स्पष्ट दिसतें. तेव्हा भवभूति व उम्बेक हे एकच हें मत निराधार आहे."

डॉ. राजा यांचा सिद्धान्त आम्हांस मान्य असला तरी त्यांनीं त्यास दिलेलीं कारणें मात्र आम्हांस सयुक्तिक वाटत नाहीत. 'ये नाम केचिदिह नः' इत्यादि श्लोक उम्बेकाच्या तात्पर्यटीकेच्या हस्तलिखितांत आरंभीं होता, असें पं. रामनाथ शास्त्री हे सांगत असल्यामुळे त्याविषयी संशय घेण्यास जागा नाही. तो श्लोक टीकेच्या आरंभीं अनुरूप नाही हें म्हणणें आम्हांस पटत नाही. उम्बेक हा जाडा मीमांसक होता. पूर्वमीमांसेच्या अनेक प्रश्नांवर त्याचीं मतें इतरांच्याहून निराळीं होतीं. हें पार्थसारथिमिश्रांच्या शास्त्रदीपिकेवरील टीकेंत त्याच्या मतांचे जे अनेक उल्लेख आले आहेत, त्यांवरून स्पष्ट दिसतें. या कारणास्तव त्याच्या हयातींतच त्याच्या मतांवर टीका झाली असल्यास नवल नाही. तो मोठा मानी व स्पष्टवक्ता होता, हें शबरस्वामी व कुमारिलभट्ट यांच्या मतांवरील त्याच्या प्रखर टीकेवरून तसेंच त्याने 'गुरोरप्यवलिप्तस्य' इत्यादि जो श्लोक उद्धृत केला आहे त्यावरूनहि उघड आहे. अशा मानी गृहस्थाला स्वकालीनांनी केलेला अनादर सहन न होऊन 'माझ्या ग्रंथाचें महत्त्व जाणणारा कोठे तरी असेल, किंवा पुढेमागे उत्पन्न होईल. त्याच्याकरितां मी तें लिहीत आहे, तुमच्याकरिता नव्हे,' असें आपल्या टीकाकारांस सांगावेंसें वाटल्यास आश्चर्य नाही. हें आपलें मनोगत व्यक्त करण्यास भवभूतीचा 'ये नाम केचिदिह नः प्रथयन्त्यवज्ञाम्' इत्यादि श्लोक उत्कृष्ट आहे असें वाटून नवा श्लोक न रचतां त्याने तो उद्धृत केला असावा. त्या श्लोकांत भवभूतीचें नांव नसल्याने तो उम्बेकाच्या बाबतींतहि तितकाच

अनुरूप होत होता. उम्बेकाने ' गुरोरप्यवलिप्तस्य ' इत्यादि दुसराहि अन्यकृत श्लोक स्वमत-समर्थनार्थ उद्धृत केला आहे. अशा प्रकारें टीकाकारांनी प्राचीन ग्रंथांतून श्लोक घेऊन त्यांचा आपल्या ग्रंथांत उपयोग केल्याचीं कांहीं उदाहरणें डॉ. राजांनी दिलीं आहेत. दण्डीच्या काव्यादर्शातील ' चतुर्मुखमुखाम्भोजवनहंसवधूर्मम । मानसे रमतां नित्यं सर्वशुक्ला सरस्वती ॥ ' हा मंगल श्लोक त्यानंतर कित्येक शतकांनी होऊन गेलेल्या उवटाने आपल्या सर्वानुक्रमणी भाष्यांत आरंभीं घातला आहे. तसेंच बाणाच्या कादम्बरींतील ' रजोजुषे जन्मनि सत्त्ववृत्तये ' इत्यादि मंगलश्लोक माधव नामक सामवेदाच्या टीकाकाराने ग्रंथारंभीं दिला आहे. अशा तऱ्हेचीं कांहीं उदाहरणें कांहीं कोरीव लेखांतहि आढळतात. उदाहरणार्थ, चालुक्य नृपति द्वितीय त्रिभुवनमल्ल याच्या शक संवत् १००६ च्या हुदली येथील कोरीव लेखांत बाणाच्या हर्षचरिताच्या आरंभींचा 'नमस्तुङ्गशिरश्चुम्बिचन्द्रचामरचारवे । त्रैलोक्यनगरारम्भमूलस्तम्भाय शम्भवे ॥ ' हा मंगलश्लोक दिला आहे. तेव्हा ' ये नाम केचिदिह नः ' इत्यादि केवळ समान श्लोकावरून भवभूति व उम्बेक हे एकच असें म्हणतां येत नाही.

डॉ. राजा यांचीं इतर प्रमाणें मात्र आम्हांस ग्राह्य वाटत नाहीत. ' ये नाम केचिदिह नः ' इत्यादि श्लोक हस्तलिखिताच्या आरंभीं असता तर त्या पहिल्या ओळींत मंगल-श्लोकास जागा राहिली नसती हें प्रमाण निरपवाद नाही. सर्वच ग्रंथकार आपल्या सर्व ग्रंथांच्या आरंभीं मंगलश्लोक घालतात, असें नाही. उदाहरणार्थ, मंडनमिश्राच्या भावना-विवेकाच्या आरंभीं तसा श्लोक नाही. तसेंच भवभूति हा वेदान्ती असल्यामुळे त्याने पूर्व-मीमांसेवर ग्रंथ लिहिला असणें शक्य नाही हें प्रमाणहि सबळ नाही. भवभूति विद्वान् श्रोत्रिय-कुलांत जन्मला होता. त्याच्या पूर्वजांनो सोमयाग केले होते. ते वेदवेदांगांच्या पठन-पाठनांत तसेंच पंचाग्निहवनांत निरत असत. अशा कुलांत वाढलेला भवभूति पूर्वमीमांसानभिज्ञ असेल असें वाटत नाही. किंबहुना, या बाबतींत अनुमान करण्याचीहि जरुरी नाहीं. आपल्या नाटकांच्या प्रस्तावनांत तो स्वतःचें ' पदवाक्यप्रमाणज्ञ ' असें वर्णन करतो. यांतील ' वाक्य ' पदाने मीमांसा, विशेषेकरून पूर्वमीमांसा, अभिप्रेत आहे. कारण पूर्वमीमांसेंत वेदवाक्यांचा अर्थ करण्याचे नियम दिले आहेत. भवभूतीच्या नांवावर असलेले पूर्वमीमांसेचे ग्रंथ अद्यापि सापडले नाहीत हें खरें, पण हें प्रमाण केवळ अभावात्मक आहे. कदाचित् पुढेमागे असे ग्रंथहि प्रकाशांत येतील. भवभूतीने आपल्या ज्ञानाचें वर्णन करतांना ' यद्वेदाध्ययनं तथोपनिषदां सांख्यस्य योगस्य च । ज्ञानं तत्कथनेन किम् ' इत्यादि श्लोकांत पूर्वमीमांसेचा उल्लेख केला नाही, असा आक्षेप कित्येक विद्वान् घेतात, पण त्यांत तथ्य नाही; कारण वरील लोकांत उपनिषदांच्या उल्लेखाने जसें त्याचें वेदान्तज्ञान अभिप्रेत आहे, तसेंच ' वेदाध्ययन ' शब्दाने पूर्वमीमांसेचें अध्ययन सूचित आहे. भवभूतीने तन्त्र-शास्त्राचा अभ्यास केल्याचाहि वरील श्लोकांत निर्देश नाही, तथापि अभिनवगुप्ताने आपल्या तन्त्रालोकांत ' दीक्षा, अभिषेक इत्यादिकांशिवाय गुरुत्व येत नाही ' या मताचें खंडन करतांना भवभूतीचा उल्लेख खालील श्लोकांत केला आहे.[२४]

२४. हा श्लोक माझे विद्यार्थिमित्र प्रा. ग. त्र्यं. देशपांडे यांनी माझ्या नजरेस आणून दिला, याबद्दल मी त्यांचा आभारी आहे.

असदेतदिति प्राहुर्गुरवस्तत्त्वदर्शिनः ।
श्रीसोमानन्दकल्याणभवभूतिपुरोगमाः ।
तथाहि त्रिंशिकाशास्त्रविवृतौ तेऽभ्युधुर्बुधाः ॥

त्यावरून भवभूतीचा तन्त्रशास्त्रावर ग्रंथ होता हें स्पष्ट दिसतें. तसा त्याचा पूर्वमीमांसेवरहि असेल. तेव्हा केवळ या अभावात्मक प्रमाणावरून त्याचें उम्बेकाहून भिन्नत्व सिद्ध होत नाही.

( ३ ) चित्सुखींतील उल्लेखाचें जरा बारकाईने वाचन केल्यास चित्सुखाचार्यांसहि भवभूति व उम्बेक हे एक वाटत नव्हते, हें दिसून येईल. ते म्हणतात, "न हि पुरा आप्त एव सन् नाटकनाटिकादिप्रबन्धविरचनमात्रेण अनाप्तो भवति भवभूतिः । उक्तं चैतदुम्बेकेन 'यदाप्तोऽपि कस्मैचिदुपदिशाति'—" इत्यादि. भवभूति व उम्बेक हे एकच असें चित्सुखाचार्यांचें मत असतें तर त्यांनी 'उक्तं चैतदुम्बेकेन' असें न म्हणतां 'उक्तं च तेनैव' असें म्हणून त्यापुढील उम्बेकाच्या टीकेंतील उतारा दिला असता. चित्सुखीच्या टीकाकाराने "भवभूतिरुम्बेकः' असें म्हटलें आहे खरें, पण तो अलीकडचा ग्रंथकार आहे. त्याच्या त्या विधानावरून त्याच्या काळीं भवभूति व उम्बेक एक होत असा समज प्रचलित झाला होता, एवढेंच आपणांस म्हणतां येईल.

हा समजहि कसा उत्पन्न झाला हें सांगणें कठीण नाही. त्याचें कारण एकच. तें म्हणजे 'ये नाम केचिदिह नः प्रथयन्त्यवज्ञाम्' इत्यादि श्लोक. हा श्लोक मालतीमाधवांत भवभूतीने स्वतःचा वृत्तांत देतांना घातला आहे हें टीकाकारांस माहीत होतें. तोच श्लोक श्लोकवार्त्तिकावरील उम्बेकाच्या टीकेच्या आरंभीं दिसल्यावर भवभूति व उम्बेक हे एकच असा टीकाकारांचा समज झाला असावा. तसेंच उम्बेकाने ज्या ठिकाणीं 'गुरोरप्यवलिप्तस्य' इत्यादि श्लोक उद्धृत केला आहे त्या ठिकाणीं कुमारिलांच्या मताचें खंडन असल्याने तो कुमारिलांचा शिष्य होता अशी समजूत रूढ झाली. कुमारिलांचा शिष्य मंडनमिश्र हा सुविख्यात मीमांसक होऊन गेला. उम्बेकहि तसाच जाडा मीमांसक होता व तो कुमारिलभट्टांना गुरु मानतो असें वाटल्यामुळे, उम्बेक व मंडनमिश्र एकच असाहि समज उत्पन्न झाला. तो विद्यारण्यांच्या शंकरदिग्विजयांत 'उंबेक इत्यभिहितस्य हि तस्य लोके' इत्यादि पूर्वोक्त श्लोकांत स्पष्ट दिसतो. मंडनाने संन्यास घेऊन सुरेश्वर असें नांव धारण केलें असें शंकरदिग्विजयांत वर्णिलें आहे. म्हणून मंडनमिश्र, उम्बेक, भवभूति व सुरेश्वर हे एकच असें मानलें गेलें. विद्यारण्यांच्या शंकरदिग्विजयांत मंडनमिश्रांना अनेक ठिकाणीं विश्वरूप म्हटलें आहे. तेव्हा भवभूति, सुरेश्वर व विश्वरूप हीं तिन्ही नांवें एकाच व्यक्तीचीं होत असें वाटून याज्ञवल्क्यस्मृतीच्या बालक्रीडा टीकेच्या एका उपटीकाकाराने पुढील श्लोकांत त्या तिघांचें ऐक्य कल्पिलें आहे—यत्प्रसादादयं लोको धर्ममार्गस्थितः सुखी । भवभूतिसुरेशाख्यं विश्वरूपं प्रणम्य तम् ॥ सारांश, टीकाकारांचीं सर्व मतें एकत्र केल्यावर मंडन, सुरेश्वर, विश्वरूप, उम्बेक आणि भवभूति अशीं पांच नांवें एकाच व्यक्तीने धारण केलीं होतीं, असें मानावें लागेल. या मतांमुळे संस्कृत वाङ्मयाच्या इतिहासांत अत्यंत घोटाळा उत्पन्न झाला आहे. ही सर्व गुंतागुंत उलगडण्याचा प्रयत्न येथे केला नाही. पण भवभूति व उम्बेक हे भिन्न होते हें मात्र सिद्ध करण्यास पुरेशीं प्रमाणें आहेत; तीं प्रस्तुत लेखांत मांडलीं आहेत. त्यांचा विद्वानांनी विचार करावा अशी विनंती करून हा लांबलेला लेख पुरा करतों. ● ● ●

डॉ. र. वि. हेरवाडकर

# बखर-वाङ्मयाची शैली

## शैलीचें महत्त्व

वाङ्मयस्वरूप लेखनाचा अभ्यास करतांना शैलीच्या दृष्टीने त्याचा विचार करणें आवश्यक ठरतें. वाङ्मयकृतीचें मूल्यमापन करतांना शैली ही एक मुख्य कसोटी मानली जाते. याचें कारण असें की, त्या वाङ्मयीन कृतीचा इष्ट परिणाम मुख्यत्वेकरून शैलीवरच अवलंबून असतो. म्हणूनच शैली हा एक स्वतंत्र वाङ्मयीन गुण मानण्याचा संकेत आहे.

## शैली म्हणजे काय ?

शैली म्हणजे काय या प्रश्नाचें उत्तर देणें कठीण आहे. शैली ( Style ) या संज्ञेत एका विशिष्ट गुणाचा अंतर्भाव होत नाही, कारण तो अनेक गुणांचा परिपाक होय. व्यावहारिक दृष्ट्या शैली म्हणजे योग्य कल्पना योग्य शब्दांत मांडणें, अशी व्याख्या करतां येईल. ही शैलीची स्थूल कल्पना होय.

आधुनिक टीकाशास्त्रांत शैलीचा विचार लेखकाच्या व्यक्तित्वाच्या दृष्टीने केलेला आढळतो. कोणत्याहि कलाकृतींत कलावंताच्या व्यक्तित्वाचें प्रतिबिंब असतें ही विचारप्रणालि आता रूढ झालेली आहे. लेखकाच्या व्यक्तित्वाची छाप त्याच्या वाङ्मयावर पडते असा सिद्धांत आधुनिक टीकाशास्त्रांत प्रस्थापित झालेला दिसून येतो. प्रत्येक लेखकाची शैली स्वतंत्र असते. लेखनशैलीवरून लेखक ओळखतां येतो; इतकेंच नव्हे तर, त्यावरून त्याच्या मनोभूमिकेची स्पष्ट कल्पना येते, हें सिद्ध करण्याचा प्रयत्न पाश्चात्त्य टीकाकारांनी केलेला आहे. शैली हा केवळ शब्दगुण नसून अर्थगुणहि आहे, हें तत्त्व सर्वमान्य दिसतें. 'Style is the man himself'[१] या वचनावरून शैलीचा संबंध लेखकाच्या मनोवृत्तीशीं किती जिव्हाळ्याचा आहे हें दिसून येईल.

## भूमिका

मराठ्यांच्या इतिहासाचीं जीं विविध प्रकारचीं साधनें आहेत त्यांपैकी बखरी हें एक होय. केवळ इतिहासच नव्हे तर वाङ्मय म्हणूनहि त्यांचें महत्त्व आहे. शैलीदृष्ट्या मराठी बखर-वाङ्मयाचें येथे मूल्यमापन करावयाचें आहे.

## विचारसौंदर्य

विचारसौंदर्य हा शैलीचा एक महत्त्वाचा घटक होय. शैलीच्या दृष्टीने विचारसौंदर्य म्हणजे लेखनाच्या विषयाची अर्थदृष्ट्या मांडणी हें होय. ग्रंथनिविष्ट भाषेमध्ये सुलभ अर्थव्यक्ति ही अत्यंत महत्त्वाची मानली जाते. अर्थव्यक्ति हा लेखनाचा प्राथमिक हेतु असला तरी ती अर्थव्यक्ति ज्या कलात्मक पद्धतीने होईल त्या दृष्टीनें त्या अर्थव्यक्तीला

१. The Problem of Style ( J. Middleton Murry, 1952 ) P. 14.

अनुक्रमणिका

महत्त्व प्राप्त होतें. 'कौशल्य मोठें रचनेंत आहे'[२] हें सूत्र अर्थव्यक्तीच्या दृष्टीने अत्यंत सार्थ आहे.

सूचकता हा अर्थव्यक्तीच्या दृष्टीने एक आवश्यक गुण होय. नादमधुर शब्दरचना, कल्पकता, अर्थानुकारी शब्दयोजना हीं अर्थव्यक्तीचीं साधनें होत. उत्कृष्ट भाषाशैलींत या गुणांचें अस्तित्व असतें.

बखरींचा हेतु इतिहासांतील घटनांचें निवदन हा होय. मूळ विषयाला कलेच्या साहाय्याने रमणीयत्व आणतां येतें. याचें प्रत्यंतर सभासदाची बखर, पानिपतची बखर ( रघुनाथ यादव-विरचित ), भाऊसाहेबांची बखर, होळकरांची थैली इत्यादि ज्या कांही वाङ्मयीन स्वरूपाच्या बखरी आहेत त्यांत दिसून येतें. सभासदाच्या बखरींतला अफजुलखानाच्या वधाचा प्रसंग याच स्वरूपाचा आहे. या प्रकरणाचा विस्तार चित्रगुप्ताच्या बखरींत अत्यंत सुंदर पद्धतीने केलेला आढळतो. कलादृष्ट्या चित्रगुप्ताच्या बखरींतला हा प्रसंग व शिवाजीच्या राज्याभिषेकाचा प्रसंग हे उत्कृष्ट आहेत. पानिपतच्या बखरींत व भाऊसाहेबांच्या बखरींत तत्कालीन घटनांचें केलेलें निवेदन आकर्षक वाटतें. चिटणिसांच्या छत्रपतींच्या चरित्रांतील घटना या मनोरम पद्धतीने निवेदन केलेल्या असल्यामुळे, वाङ्मयदृष्ट्या हीं चरित्रें सुंदर उतरलीं आहेत.

चिटणिसांच्या संभाजीराजे यांच्या चरित्रांतील खंडो बल्लाळांच्या स्वामिनिष्ठेच्या प्रसंगाचें वर्णन पुढीलप्रमाणे आहे :

"महाराजांनीं खासा घोडियावरून जिनास पाणी लागे तों घोडा घातला. त्याजबराबर खंडो बल्लाळ याणी घोडा घालून तरवार मारिली. शिपायगिरी केली. गोवेकर सावध जाले. पाणी चढले तेव्हां माघारे फिरले. तों घोडा पहुणीस लागला. खंडो बल्लाळ याणी उडी टाकून महाराजांचा घोडा धरून पोहून बाहेर निघाले. ते समयीं बहुत संतोष होऊन पोटाशीं धरिले, आणि बोलिले जे, 'तुझे वडील निरपराधे लुच्यांचे सांगण्यावरून विचार न करिता मारिले असतां आज चाकरीची शर्त केली ! तुझी चिटणिशी महाराजांनीं वंशपरंपरे करून दिल्ही, निसबतीचे धंदे कारखानिशा जमनिशा ते बहाल आहेत. कैलासवासी महाराज तुमचे वडिलांवरि प्रीती विश्वास ठेऊन करीत होते तें पाहिलें आहे. त्याहून अधिक तुम्हावर प्रीती विश्वास ठेऊन चालवीन. कुलीन खरे !' ऐसे नांवाजून 'आमचे वंशाचा असेल तो परंपरेने तिन्ही धंदे चालवील' ऐसे पुनः आश्वासन देऊन घोडा बक्षीस दिला."[३]

वरील वर्णनांतील निवेदन साधें असूनहि तें चित्तवेधक झालें आहे. खंडो बल्लाळाच्या स्वामिनिष्ठेचें दर्शन बखरकाराने सूचकतेने केलेलें दिसतें. प्रस्तुत वर्णनांतील घटनेला सूचकतेची पार्श्वभूमि लाभल्यामुळे हें वर्णन उठावदार झालें आहे.

याप्रमाणेच होळकरांची थैली, नानांचें आत्मचरित्र, हरिवंशाची बखर यांतहि विचार-सौंदर्य आढळतें. या बखरींचें वाचन करतांना एखाद्या रम्य कादंबरीची आठवण होते. भिन्न भिन्न व्यक्ति व प्रसंग यांचें कलात्मक दर्शन यांत होत असल्यामुळे विचारसौंदर्य हा गुण त्यांत आढळतो. म्हणूनच या बखरींचा वाङ्मयीन दर्जा उच्च झाला आहे.

२. काव्यरत्नावलि ( मे १८९६ ).

३. श्रीमंत छत्रपती संभाजीमहाराज यांचें चरित्र ( संपा.–का. ना. साने, १९३० ) पृ. २५.

### भावनासौंदर्य

विचाराप्रमाणे भावनांचेंहि महत्त्व वाङ्मयांत असतें. काव्यांत भावना चांगल्या रीतीने व्यक्त होऊं शकतात हें खरें असलें तरी गद्यांतहि त्या चांगल्या रीतीने व्यक्त होऊं शकतात. बाणभट्ट, हर्ष, दंडी इत्यादि लेखकांनी संस्कृत गद्यांत भावनाविष्कार केला. मराठी वाङ्मयांत शिवरामपंत परांजपे यांचे 'काळांतील लेख' हें उत्कृष्ट भावनासौंदर्याचें उदाहरण होय.

मराठी बखरींत भावनासौंदर्य हा वाङ्मयगुण विशेष प्रमाणांत आढळून येतो. याचें कारण म्हणजे बखरलेखकाचा वर्ण्यविषयाचा जिव्हाळा होय. एका विशिष्ट भावनेने प्रेरित होऊन बखरींचें लेखन झाल्यामुळे त्यांत बखरकारांची भावना स्पष्टपणें प्रतिबिंबित झाली आहे. याशिवाय प्रसंगानुरूप लेखकांच्या अंतःकरणांतली भावनांची खळबळ बखरींत दिसून येते.

भावनासौंदर्याच्या दृष्टीने भाऊसाहेबांची बखर सर्वोत्कृष्ट आहे. पानिपतसारखा रोमहर्षक प्रसंग, त्यांत मराठ्यांवर आलेलें संकट व त्यामुळे झालेली भीषण परिस्थिति या सर्वांचें वर्णन बखरकाराने अत्यंत भावनात्मकतेने केलें आहे. प्रस्तुत बखरींत दत्ताजी शिंद्याचा वध, गोविंद-पंत बुंदेल्याचा मृत्यु, बळवंतराव मेहेंदळे यांचा मृत्यु या प्रसंगांचीं वर्णनें अत्यंत हृदयस्पर्शी आहेत. नानांच्या आत्मचरित्रांत पानिपतहून पुण्यास येतांना नानांवर ओढवलेल्या कटीण प्रसंगाचें वर्णन रोमांचकारक वाटतें. चिटणिसांच्या संभाजीच्या चारित्रांतील संभाजीवर आलेल्या दुःखद प्रसंगाचें वर्णन, तसेंच राजाराम जिंजीस गेल्यावर मोगलांनी केलेल्या मराठ्यांच्या ससेहोलपटीचें वर्णन, पटवर्धनी बाखरींतील कुंदगोळच्या लढाईचें वर्णन, श्रीमंत नारायणराव पेशवे यांच्या बखरींतील नारायणराव पेशव्यांच्या खुनाचें वर्णन हीं सर्व मनावर परिणाम केल्याशिवाय राहत नाहीत.

भाऊसाहेबांच्या बखरींतील मराठ्यांच्या पळाचें वर्णन खालीलप्रमाणे आहे :

> " कितीकास दिल्लीचा मार्ग सापडला. त्यांचे मागोमाग दिल्लीस ( व तेथून ) भिंडीवर आले. वाटेने कितीक जिवें मारिलें. कितीएकास लुटून सोडून दिलें. दिल्लीचा मार्ग न सापडला आणि आडमार्गे पायाने ( जे ) गेले ते फिरत फिरत जाता जाता तीस–चाळीस हजार जमले. त्यास पंचवीसपन्नास दांडगे मिळून घोडीं हिरोन घेईत. असा अनर्थ होऊन मातबर माणूस पायउतारा जाले. बहुतास अन्न कोठे न मिळे. मग अवघे जमून, मथुरेस येऊन एक दिवस दम खाल्ला. तों हजारों हजार थोर थोर मनुष्य नागवे उघडे केवळ भणंग, कंगाल, अन्नरहित, वस्त्राने रहित, कळाहीन चीलची भाजी खात आले ! " [४]

वरील वर्णन सहृदयतेने केलें असल्यामुळे त्यांत भावनासौंदर्य निर्माण झालें आहे व त्यामुळेच तें आकर्षक वाटतें.

मराठ्यांचा इतिहास हा उज्ज्वल आहे. त्यांत राष्ट्रप्रेम, स्वामिभक्ति, स्वधर्माभिमान इत्यादि गुण उच्च कोटीला पोचलेले आहेत. अशा गुणांच्या भावनोत्कट प्रसंगांचें निवेदन बखरलेखकांनी अत्यंत हळुवारपणें केलेलें आढळतें. भावनोत्कटता हा बखरवाङ्मयाचा विशेष होय. इतिहासांतील हर्षामर्षाच्या प्रसंगांत विविध भावनांचीं चित्रें रंगविण्यांत बखरकारांचें अनुपम कौशल्य दिसतें. या भावनासौंदर्यामुळे बखरींचें वाङ्मयीन मूल्य निःसंशय वाढलेलें आहे.

---

४. भाऊसाहेबांची बखर ( संपा.–का. ना. साने, १९३२ ) पृ. १६०.

**रसात्मकता**

रसात्मकता किंवा रसवत्ता हा शैलीचा एक प्रभावी गुण होय, रसाचें कार्य वाचकाच्या मनांत भावनाजागृति करण्याचें असतें. ही भावनाजागृति जितक्या उत्कट प्रमाणांत होईल तितक्या उत्कट प्रमाणांत रसिकास आनंद होईल. रसोत्कटता ही वाङ्मयाची मुख्य कसोटी असल्यामुळे वाङ्मयाचें यशापयश तिच्यावरच अवलंबून असतें.

मराठी बखरवाङ्मयांत रसोत्कटता निश्चितपणें आढळते. बखरींचे विषय ऐतिहासिक स्वरूपाचे असल्यामुळे त्यांत प्रायः वीर व करुण हे दोन रस आहेत. थोर ऐतिहासिक पुरुषांचीं चरित्रें लिहिणें किंवा अभिमानास्पद अशा ऐतिहासिक प्रसंगांचें वर्णन करणें हें बखरलेखनाचें ध्येय होतें; एवढेंच नव्हे तर, समाजाला स्फूर्ति देण्याचा किंवा त्यांत नवचैतन्य निर्माण करण्याचें दुसरेंहि ध्येय होतें. स्वदेशाच्या इतिहासाच्या आस्थेनेच बखरी निर्माण झाल्या हें ध्यानांत घेतल्यास ऐतिहासिक वाङ्मयाला आवश्यक असणाऱ्या वीररसाचा प्रकर्ष बखरींत कां दिसून येतो हें स्पष्ट होईल.

वीररसाप्रमाणे करुणरसहि बखरींत येणें अपरिहार्य आहे. युद्धांतील यशाचें वर्णन करतांना वीररसाचें वर्णन हें स्वाभाविकपणें जसें येतें तसेंच अपयशाचें वर्णन करतांना युद्धांतील भीषण संहाराची कल्पना येण्यासाठी करुणरसाच्या वर्णनाची आवश्यकता निर्माण होते. अफजलखानाचा वध, वसईचा रणसंग्राम, खडर्याची लढाई इत्यादि शौर्याच्या प्रसंगांवरील बखरींत वीररसाचा प्रकर्ष दिसून येतो तर पानिपतचें युद्ध, नारायणराव पेशव्यांचा खून यांसारख्या दुर्दैवी प्रसंगांच्या बखरींत करुणरस आढळतो. पानिपतच्या युद्धाचा विषय असलेल्या भाऊसाहेबांच्या बखरीच्या सुरुवातीस वीररस असून शेवटीं त्याचें पर्यवसान मराठ्यांचा सर्वनाश झालेल्या परिस्थितींत म्हणजे करुणरसांत झालेलें आहे.

पानिपतच्या युद्धाचें वर्णन करतांना भाऊसाहेबांच्या बखरीचा लेखक लिहितो :

> 'परस्परें गोळागोळीस तोंड लागलें. त्याजकडील तीनशें तोफा व गनिमांकडील दोनशें तोफा, एकदाच सरबत्ती झाली. शिवाय धाकटीं यंत्रें, हस्तनाला व सुतरनाला व जेजाला व बंदुका व रेकले ह्यांस गणित नाही. मोठीशी गर्दी होऊन गेली. धुराचे गर्दीनें सूर्यबिंब आच्छादिलें. कोणाची खबर कोणास नाहीशी जाली. त्यांत शूर होते त्यास वीरश्रिया आल्या. भ्याड होते त्यांस ऐसे जालें कीं, 'धरणीमाय दे ठाय' तैसें जालें. धडाकियाखाली घोडे मनुष्यें धुंद जालीं. रणतुरें व रणभेरी व आराबियाचीं वाद्यें यांचा एकदाच कल्होळ जाला. उभय दळें मिळतीं जालीं......... तोफाहि सुटत होत्या. लढाई मना जाली नव्हती. मातबर एक प्रहरपर्यंत लढाई केली.''[५]

लेखक वर्ण्यविषयाशीं तन्मय झालेला असल्यामुळे हें युद्धप्रसंगाचें वर्णन उत्कृष्ट वाटतें. त्यांतील बारकाव्यावरून बखरकाराच्या युद्धविषयक ज्ञानाची कल्पना येते. लहान लहान वाक्यांच्या योजनेमुळे हें वर्णन चित्तवेधक झालें आहे यांत शंका नाही. 'एकदाच सरबत्ती झाली', 'धुंद जाली', 'एकदाच कल्होळ जाला' इत्यादि समर्पक शब्दप्रयोगांमुळे सदर प्रसंगाचें चित्र डोळ्यांपुढे स्पष्ट उभें राहतें. या वर्णनांत बखरलेखकाच्या निवेदनशैलीने उच्चांक गाठला आहे.

प्रस्तुत बखरींतील दत्ताजी शिंदे यांच्या मृत्यूनंतर शिंद्यांच्या गोटांतील शोककारक प्रसंगाचें वर्णनहि उठावदार आहे. या वर्णनांतील शोक हा त्यांतील तत्त्वज्ञानात्मक विचारा-

५. भाऊसाहेबांची बखर (संपा.—का. ना. साने, १९३२) पृ. १४७.

मुळें अधिकच तीव्र झालेला दिसतो. त्यांतील भागीरथीबाईच्या सांत्वनपर भूमिकेमुळे तिची शोकविषयक भावना व तत्त्वज्ञानात्मक विचार या दोहोंचा कलात्मक संगम प्रस्तुत वर्णनांत आढळतो. यामुळे हा प्रसंग हृदयस्पर्शी झाला आहे.

मराठी बखरी त्यांतील रसोत्कटतेमुळे आकर्षक झाल्या आहेत.

व्यक्तिमत्त्व

व्यक्तिमत्त्व हा वाङ्मयाचा महत्त्वाचा घटक असल्यामुळे त्याच्या स्वरूपावर वाङ्मयाचा परिणाम अवलंबून असतो. हा वाङ्मयीन संकेत निरपवाद आहे. हें व्यक्तिमत्त्व नेमकें कशांत असतें हें सांगणें कठीण असलें तरी त्याचें स्वरूप वाङ्मयाचें रसग्रहण करून समजण्यासारखें आहे. शब्द, वाक्यें, भाषेची लकब, कल्पना-विचारांची मांडणी इत्यादि गोष्टींत सामान्यत: लेखकाचें व्यक्तिमत्त्व दिसून येतें. लेखनशैलीचें स्वरूप लेखकाच्या व्यक्तिवैशिष्ट्या-प्रमाणे बदलतें.

मराठी बखर-वाङ्मयांत हें व्यक्तिमत्त्व प्रभावी असल्याचें दिसून येतें. बखरी–विशेषत: समकालीन बखरी–त्यांतील लेखकांच्या प्रभावी व्यक्तिमत्त्वामुळे यशस्वी झालेल्या दिसतात. सभासदाची बखर, चिटणिशी बखरी, भाऊसाहेबांची बखर, शिवदिग्विजय, हरिवंशाची बखर इत्यादि बखरी लेखकांच्या व्यक्तिमत्त्वामुळे आकर्षक झालेल्या आहेत.

बहुतेक बखरकार हे तत्कालीन राजकीय जीवनाशीं संबद्ध होते. राजकीय वातावरणाचें त्यांनी सूक्ष्म निरीक्षण केलें असल्यामुळे त्याची प्रतिक्रिया त्यांच्या लेखनांत दिसून आल्यास नवल नाही. बखरकारांनी स्वतःच्या भावनांना व विचारांना आपल्या लेखनांत वाट दिलेली आहे. त्यांच्या लेखनांत प्रामाणिकपणा दिसतो. या साऱ्याचा परिणाम म्हणजे त्यांचें व्यक्तिमत्त्व बखरींत ठळकपणें दिसून येतें. प्रत्येक बखरलेखकाच्या भाषेचा डौल, कल्पनांची भरारी, वर्णनाचें सामर्थ्य इत्यादि गोष्टी स्वतंत्र आहेत.

रघुनाथ यादव-विरचित पानिपतच्या बखरींत स्वकीयांविषयी वाटणाऱ्या जिव्हाळ्यामुळें लेखकाचें व्यक्तिमत्त्व किती प्रभावी झालें आहे हें पाहण्यासारखें आहे. लेखक म्हणतो :

"अशा प्रकारचीं सर्व समुदायाचीं उत्तरें जिकीरीचीं रायांनी ऐकून घेऊन प्रत्युत्तर दिलें की, होणारास उपाय काय ?......आता शरीर तृणप्राय मानून मर्दुमीचा हिंय्या न सोडितां, समशेरीची शर्थ करून दाखवावी......आता भय धरल्याने काय होतें ? श्रीसांबकृपेने इराणीस मारून गर्दीस मिळवून देऊं. सत्कीर्ती करून मरावे या भूषणापरतें दुसरें काय आहे ? उद्या सर्वांनी खंदकपार होऊन मारतां मारतां कटून मरावें... ...हा निश्चय सदाशिवपंतांनी करून सर्वत्रास विडे देऊन बोळविलें."[६]

वरील उताऱ्यांत स्वकीयांचा आत्मविश्वास व स्वकीयांची कर्तव्यनिष्ठा यांविषयी लेखकाला वाटणारा उत्कट अभिमान व्यक्त झाला आहे. हा अभिमान त्याच्या व्यक्तिमत्त्वाचा महत्त्वाचा घटक आहे. सदर उताऱ्यांतील प्रत्येक वाक्यांत लेखकाचें व्यक्तिमत्त्व प्रतिबिंबित झालेलें दिसतें.

मराठी बखरकारांचें व्यक्तिमत्त्व त्यांच्या लेखनांत प्रभावीपणे प्रकट होण्याचें प्रमुख कारण म्हणजे मनांतील भाव उत्तम रीतीने व्यक्त करण्याचें कसब त्यांच्या अंगीं होतें. बखरींच्या यशाचें रहस्य बखरकारांच्या विलोभनीय व्यक्तित्वांत आहे हें मान्य केलें पाहिजे.

६. पानिपतची बखर (संपा.–का. ना. साने, १८८९) पृ. ३४.

मनाची जबरदस्त पकड घेणारा हा वाङ्मयप्रकार त्यांतील प्रभावी व्यक्तिमत्त्वामुळे यशस्वी झाला यांत सुतराम् संदेह नाही.

वक्तृत्व

वक्तृत्व हा शैलीचा अंतर्गत असा गुण आहे. तो विशिष्ट असा एक गुण नाही. भावनोत्कटता, आवेश, उदात्तता, भाषेचा अखंड ओघ इत्यादि गुणांचा त्यांत अंतर्भाव होतो. वर्ण्यविषयासंबंधी वाटणारा जिव्हाळा हा वक्तृत्वाचा आधारभूत गुण होय. भाषेचा अखंडपणा हा विचारांच्या निश्चितपणावर अवलंबून असतो. अर्थात्, विचार व्यक्त करण्यासाठी भाषा-प्रभुत्व अवश्य हवें.

मराठी बखरींत वक्तृत्व गुणाची श्रेणी उच्च दर्जाची आढळते. भाऊसाहेबांची बखर या गुणामुळेच वाचनीय झाली आहे. प्रस्तुत बखरींत भाषेचा अखंड प्रवाह, आवेश, भावनोत्कटता इत्यादि गुण चढत्या श्रेणीने दिसून येतात. तींत भावनांची व विचारांची साखळी अतूट अशी आहे. कोणताहि प्रसंग पाहा-मग तो दत्ताजी शिंद्याचा असो, गौतमाबाईने केलेल्या मल्हारराव होळकराच्या निषेधाचा असो किंवा बळवंतराव मेहेंदळ्यांच्या मृत्यूचा असो, हे सर्व प्रसंग वक्तृत्वाच्या उत्कटतेने रसरसलेले आहेत. लेखकाने या प्रसंगांचें केलेलें निवेदन नाट्यपूर्ण असून एखाद्या विद्युल्लतेप्रमाणे दिपविणारें आहे. वक्तृत्व हें लेखनकलेला कसें सहायभूत होतें याचें उदाहरण म्हणजे प्रस्तुत बखर होय.

भाऊसाहेबांच्या कैफियतींतील पानिपतच्या युद्धाच्या वर्णनांत वक्तृत्व कसें दिसून येतें तें पाहा. कैफियतकार लिहितो :

" त्याणे ( इब्राहिमखान गारदी ) जिवाचा निधडा करून शिपाईगिरी म्हणावी तैशी केली, ज्याचें नांव शिपाईगिरी. कितेक गारदी ( खेतांत ) आले व कितेक ठार जाले. हुजुरातीचे लोक जवळचे पळों लागले. तोफखाना बंद जाला. जातीनिशी तरवार सीमेपरती केली. जाऊन गिलचाचे लष्करांत मिसळला. दहा पांच ठार केले. भोवता वेढा गिलच्याचा पडला. आंगावर जखमा भारी पाडिल्या. ऐसे असता लढतच होता. प्रयत्न न चाले तेव्हा हत्यारें राहिलीं. धरून नेला. तेव्हा हें वर्तमान श्रीमंतास कळलें. मल्हारजी होळकर याचें बाजूवरहि मातबर जुंज जालें. रेटत नाहीसे जाले तेव्हा तेहि बाजूस सोडून निघाले. भाऊसाहेबांचे हेंच तोंडीं की, हाणा हाणा हेंच करीत असता जातीनिशी मोठा हिय्या केला. बहुत जुंज मातबर केलें ते कोठवर ल्याहावें ! सरकारचे मुत्सद्दी तमाम बिलकुल एकीकडे पळों लागले. सोनजी भापकर यासि भाऊसाहेब बोलले की, 'सोनजीबाबा हा समय निघावयाचा आहे. तुमचा भरवसा बहुत धरला होता. उभे रहावें.' तेव्हा बोलले की, कुल लोक पळतात त्याजला माघारे फिरवितो. साहेबास टाकून आम्ही कोठे जावे ? ऐसे म्हणोन लोक फिरवावयास गेला तो तिकडेच गेला. तेव्हा मुकुंदजी शिंदे म्हणो लागले की, 'महाराज, क्षात्र धर्माची शर्त जाली ! याजउपर निघावें हें उत्तम आहे.' तेव्हा भाऊसाहेब बोलले की, 'मुकुंदजीबाबा, आता कोणीकडे जावें ? काय तोंड दाखवावें ? रावसाहेबाकडे पहावें.' तेव्हा मुकुंदजी शिंदे याणी घोडियावरून उडी टाकिली. जातीने हत्यार करवले तेथवर केले. मातबर मराठे धर्माची शर्थ करून ठार जाले."[७]

वरील वर्णनांत एकसूत्रीपणा असून भाषेचा अखंड ओघ आहे. आवेश व भावनोत्कटता हे गुण त्यांत स्पष्टपणें दिसून येतात. लेखक वर्ण्यविषयाशीं समरस झाल्यामुळे या वर्णनांत वक्तृत्वाचें विलक्षण सामर्थ्य आढळतें.

७. श्रीमंत भाऊसाहेब यांची कैफियत ( संपा.-का. ना. साने, शके १८०९) पृ. २४.

याप्रमाणेच सभासदाची बखर, चिटणिसाचीं छत्रपतींचीं चरित्रें, साष्टीची बखर, नाना फडणीस व गंगाधरशास्त्री पटवर्धन यांचीं आत्मचरित्रें, पेशव्यांची बखर ( कृ. वि. सोहनी-विरचित ), पटवर्धनी वाका, जावलीकर मोरे यांची छोटी बखर इत्यादि बखरींत वक्तृत्व हा गुण विशेषत्वाने प्रत्ययास येतो. यामुळे या बखरी डोळ्यांत भरण्यासारख्या झाल्या आहेत.

## सुबोधता

सुबोधता हा शैलीचा बाह्यगुण होय. सुबोधता म्हणजे स्पष्टार्थ व्यक्त होणारी शब्दरचना. सुबोधता म्हणजे सरलता अशी कल्पना असली तरी सरलतेशिवाय इतर गुणांचाहि तींत अंतर्भाव होतो. नादमाधुर्य, अपरिचितार्थ-व्यक्तीकरण, कल्पनारम्यत्व हे सुबोधतेचे म्हणजे पर्यायाने अर्थगौरवाचे पैलू होत.

मराठी बखरी सुबोध आहेत. विषयाची आत्मीयता व विचारांची स्पष्टता यांमुळे बखरकारांच्या लेखनाला सुबोधत्व प्राप्त झालेलें दिसतें. त्यांत सुबोधतेचें मुख्य लक्षण म्हणजे सहजता हें स्पष्टपणें आढळतें. सभासदाची बखर, चिटणिसांच्या बखरी, भाऊसाहेबांची बखर इत्यादि कांही बखरी आज्ञेने लिहिल्या असूनहि त्यांत सहजता दिसून येते. त्यांत लेखनाची जी सफाई दिसते तिचें मुख्य कारण म्हणजे लेखकाचें वर्ण्यविषयाशीं तादात्म्य हें होय.

सुबोधतेचें प्रमाण मराठी बखरींत कमीअधिक स्वरूपांत दिसतें. उदा. चिटणिसांच्या बखरींपेक्षा सभासदाची बखर अधिक सुबोध आहे. नानांच्या आत्मचरित्रापेक्षा गंगाधरशास्त्री पटवर्धनांचें आत्मचरित्र किंवा बापू कान्होचें आत्मचरित्र यांत अधिक सुबोधता आढळते. शिवप्रताप, शिवदिग्विजय या बखरींपेक्षा पेशव्यांची बखर (कृ. वि. सोहनी-विरचित) भाऊसाहेबांची बखर, पानिपतची बखर, हरिवंशाची बखर ह्या अधिक सुबोध आहेत. चित्रगुप्ताची बखर, भोंसलवंशचरित्र व सनपुरीची बखर यांत सुबोधपणा दिसून येत नाहीं. प्रौढ शब्दरचनेमुळे व अलंकारांच्या अमर्याद उपयोगामुळे त्यांत क्लिष्टत्व निर्माण झालेलें आढळतें. नागपूरकर भोंसल्यांच्या बखरींत सुबोधत्व असूनहि सहजता दिसून येत नाही. ब्रह्मेंद्रस्वामींची बखर व शाहू-महाराजांची बखर (गो. खं. चिटणीस-विरचित) यांत सुबोधता फारच कमी प्रमाणांत आढळते.

सुबोधतेच्या दृष्टीने सोहनीकृत पेशव्यांच्या बखरींतील पुढील वर्णन उल्लेखनीय आहे:

"शेवटीं विश्वासरावसाहेब यास अंबारींत गोळी कोणी दुष्टाने मारली. त्याणे ते ठार झाले. ते सदाशिवपंत भाऊ यांणी पाहून अगदीं निदान केलें. आता दक्षिणेंत जाऊन काय तोंड दाखवावें ? असा निश्चय करून राहिलें सैन्य समागमें घेऊन मल्हारराव होळकर दाहा हजार फौजेनिशी होते त्यास भाऊसाहेब यांणी सांगितलें की, 'आता तुम्ही सर्वांचे कबिले घेऊन बाजारबुणगे संभाळून माघारे दक्षिणेंत जावे.' तेव्हा नाना फडणीस वगैरे मंडळी होती ती माघारी फिरली व भाऊसाहेब याणी युद्धास आरंभ करून आपण जातीने तीन हजार स्वारानिशी गिलच्याचे फौजेंत मिसळून गेले. त्या समयीं युद्ध मोठें घनचक्र झालें. शके १६८२ पौष शुद्ध ८ मीस भाऊसाहेब गर्दींत मिळाले. कोठे ठिकाण नाहीसें झालें. साडेतीन लाख फौज तितकीही तेथे खपली. त्या दिवशीं मोठे उल्कापात झाले. दिवसास तारा पडला. दिवाकर चार घटका असता अंधःकार पडला. असें युद्ध मानवी मागे झालें नाही व पुढे होणार नाही. असा लौकिक सदाशिवपंत भाऊ याणी युद्धाचा मिळविला."[८]

---

८. पेशव्यांची बखर ( संपा.-का. ना. साने, १९२५ ) पृ. ६३.

वरील उताऱ्यांतील वर्णन सार्थ आहे. लेखक वेचक व परिणामकारक शब्दांच्या साहाय्याने युद्धाचें वर्णन करतो. त्यामुळे त्यांत व्यक्तिवर्णन व प्रसंगवर्णन हीं सुरेख साधलीं आहेत. सुबोधतेमुळे हें वर्णन चित्तवेधक वाटतें.

वाङ्मयीन गुण असलेल्या बखरींत सुबोधता व सहजता हीं प्रायः आढळतात. कित्येक वेळां सुबोधता असूनहि सहजता आढळत नाही हें आपण पाहिलें; परंतु सहजता असेल तर सुबोधतेचें साहचर्य त्याच्याशीं बहुशः असतें हें वरील उदाहरणावरून दिसून येतें. सहजता ही भावना व विचार यांच्या उत्कटतेवर अवलंबून असते. मराठी बखरींत सुबोधतेच्या मानानें सहजतेचें दर्शन कमी प्रमाणांत होतें. पण भाऊसाहेबांची बखर, पानिपतची बखर इत्यादि बखरींत ती कटाक्षाने आढळते.

## पारंपरीणता ( परंपरासाहचर्य )

पारंपरीणता याचा अर्थ आंधळें गतानुगतिकत्व नव्हे. स्वतःचें व्यक्तित्व ठेवून गत-परंपरेचें डोळस अनुकरण करणें हींच खरी पारंपरीणता. ही पारंपरीणता जुने अर्थपूर्ण शब्द, जुनी अविच्छिन्न विचारप्रणालि, औचित्यपूर्ण पौराणिक दाखले व सुभाषितें इत्यादि स्वरूपांत दिसून येते. पारंपरीणतेचें महत्त्व शैलीच्या दृष्टीने विशेष आहे.

मराठी बखरलेखनांत परंपरासाहचर्याचें स्वरूप अनेक प्रकारें दृग्गोचर होतें. या बाब-तींत प्रामुख्याने जी गोष्ट नजरेस येते ती म्हणजे निवेदनाची पौराणिक पद्धति होय. सृष्टीच्या उत्पत्तीपासून इतिहास देण्याची पौराणिक परंपरा ही महिकावतीची बखर, चिटणिसांचें सप्त-प्रकरणात्मक चरित्र, भोंसलवंशचरित्र, शिवदिग्विजय या बखरींत आढळून येते. सभासदाची बखर, सप्तप्रकरणात्मक चरित्र व खर्ड्याच्या स्वारीची बखर यांत फलश्रुति आहे. ही पद्धति पेशवेकालीन विषयांवरील बखरीपेक्षा शिवकालीन विषयांवरील बखरींत विशेषेकरून दिसून येते.

परंपरासाहचर्याचा दुसरा प्रकार म्हणजे पौराणिक दाखले देण्याची पद्धति हा होय. या दृष्टीने पुढील कांही दाखले उल्लेखनीय आहेत :

१. जैसा धर्मराजे राजसूय यज्ञ संपविला किंवा रघुराजे धरादत्त करून संपूर्ण धरा ब्राह्मणास दान दिधली, किंबहुना जनमेजयांनी सर्पसत्र अजंब संपादिलें यद्वत ( तद्वत् ) कल-युगी महाराजांनी दानधर्माची निस्सीमताच केली.[९]

२. जसा श्रीभगवंते पांडवाचे घरीं उच्छिष्टादि काढिली, अश्वाची सेवा, सारथ्य केलें, शेवट सुभद्रादि जाला, असा भक्तकाजकल्पद्रुम त्याप्रमाणे महाराज या लोकांस दैववशे प्राप्त जाला.[१०]

परंपरासाहचर्याचें आणखी एक स्वरूप बखरींतील सुभाषितांच्या स्वरूपांत आढळतें. प्रसंगानुरूप संस्कृत सुभाषितें यांचा बखरकारांनी चांगला उपयोग केलेला दिसून येतो. संस्कृतांतील अलंकारांचे संकेत त्यांनी पाळलेले आहेत. हें परंपरासाहचर्य व लेखकांचें व्यक्तित्व यांच्या कलात्मक संगमामुळे बखरींना वाङ्मयीन तेज चढलेलें आहे.

## आवेश

इष्ट परिणामाच्या दृष्टीने आवेशपूर्ण लेखन हें शैलीचें महत्त्वाचें अंग होय. आवेश हा

९. शिवाजीमहाराजांची बखर–चित्रगुप्त ( काव्येतिहाससंग्रह ) पृ. १०८.
१०. श्रीशिवदिग्विजय ( शके १८१७ ) पृ. १२०.

भावनांतर्गत गुण असल्यामुळे तो निर्माण होतो. भावनासौंदर्याचा आवेश हा साहाय्यकारी गुण आहे.

बखरीची कथावस्तु म्हणजे ऐतिहासिक घटना. बखरींत जो आवेश दिसतो तो बखरकाराचा त्याच्या कथावस्तूशीं तादात्म्यामुळे किंवा प्रसंगीं साक्षात् संबंधामुळे होय. समकालीन बखरींत आवेशाचें प्रमाण अधिक आहे. शिवछत्रपतींचें चरित्र हें सभासदानें प्रत्यक्ष अनुभवाच्या आधारें लिहिलें. भाऊसाहेबांच्या बखरींत आवेश हा गुण प्रकर्षानें आढळतो. कारण ही बखर पानिपत-प्रसंगानंतर लवकरच लिहिली गेली. रघुनाथ यादवाची बखर याच स्वरूपाची आहे. काशिराजाची बखर पानिपतच्या युद्धांत स्वतः काशीराज हजर असल्यामुळे आवेशपूर्ण झाल्यास नवल नाही. नाना फडणवीस, गंगाधरशास्त्री पटवर्धन, बापू कान्हो यांच्या आत्मचरित्रांत आवेश आढळतो, कारण त्यांत त्यांच्या जीवनाचा इतिहास आहे.

समकालीन बखरकारांना प्रत्यक्ष अनुभवांचें पाठबळ असल्यामुळे त्यांच्या लेखनांतील आवेश कलादृष्ट्या सुंदर वाटतो. उत्तरकालीन बखरींत तो लेखकाच्या निवेदनकौशल्यामुळेच विशेषतः निर्माण झालेला दिसतो. या गुणामुळे बखरी वाचनीय झाल्या हें निर्विवाद.

संयम

एखादा विचार थोडक्या पण अनुरूप शब्दांत जितक्या चांगल्या रीतीनें व्यक्त होऊं शकतो तितका तो पुष्कळ पण अननुरूप शब्दांत व्यक्त होऊं शकत नाही हें उघड आहे. शब्दांचें अल्पाक्षरत्व हें शैलीदृष्ट्या लेखनाचें महत्त्वाचें तंत्र होय. शब्दांच्या अल्पाक्षरत्वाबरोबर अर्थव्यक्तीची प्रभूतताहि असली पाहिजे; कारण इष्टार्थ व्यक्तीखेरीज नुसत्या शब्दावडंबराचा काय उपयोग ?

मराठी बखर-गद्यांत संयम हा शैलीविषयक गुण आढळत नाही असा सकृद्दर्शनीं ग्रह होतो. बखरनवीस पाल्हाळानें लिहीत आहे असें वाटतें खरें; परंतु सूक्ष्म दृष्टीनें पाहिल्यास त्या पाल्हाळाला कांही मर्यादेचे संकेत आहेत असें दिसतें. बखरीला आपाततः दिसून येणारा पाल्हाळ हा त्यांतील विषयाचा कलादृष्ट्या आवश्यक असा विस्तार आहे हें लक्षांत ठेवलें पाहिजे.

पानिपतच्या बखरींत ( रघुनाथ यादव-संपादित ) संयम या गुणाचा कसा आविष्कार झाला आहे हें खालील उताऱ्यावरून दिसून येईल :

" तेव्हा युद्धास तोंड लागलें, दारुण संग्राम झाला. हवद्यांस हवदे, राउतास राउत, एक मेळ जहाला व सुतरनाले बाणांच्या कैऱ्या व करोलाच्या गोळ्या व गरनाला व तोफांचा मार एकदाच जहाला. एकच रणधुमाळी दोन्ही सैन्यांत माजली. धुरें करून दिनमणीचा अस्त झाला असा भास पडला. घे घे हीच गर्जना उठली. उमास घ्यावयास अवकाश पडेना. पुढचा पाय पुढे. कोणास कोणी हरेना. एका परीस एक आगळे. इराणीची जात अरबुज, आपपर म्हणावयाची नाही. महाबळी महापराक्रमी, मोंगल, पठाण व रोहिले रांगडे व रजपूत व पंजाबी, बिलंदे, माळवी व काठेवाडी नाना जातीचे त्यांनीं संग्रामाची सीमा केली. बहुत मराठे दळ खपले. रक्तोदकाचे पाट रणभूमीस वाहू लागले. बिभित्स शरीरें दिसों लागलीं. देहाभिमान कोणांत उरला नाही. चौभेर लढाईची बेहद्द होऊन गेली. थोर थोर अमिरांचे हौदे खाली जहाले. इराणी हावभरी होऊन फिरून नीट फौजेंत चालून घेतलें. तेव्हा मराठी फौज कच खाऊन माघारी सरली."[११]

११. पानिपतची बखर ( साने, १८८९ ) पृ. ४०.

अनुक्रमणिका

संयम गुणाच्या दृष्टीने सभासदाची बखर, एक्क्याण्णव कलमी बखर, होळकरांची थैली, भाऊसाहेबांची कैफियत, भाऊसाहेबांची बखर, पटवर्धनी वाका, खर्ड्याच्या स्वारीची बखर इत्यादि बखरी विशेष उल्लेखनीय आहेत. या गुणामुळे बखरींची रंजकता वाढलेली दिसते.

### उदात्तता

वाङ्मयांत व्यक्त होणाऱ्या विचारांची बैठक उदात्त स्वरूपाची असली पाहिजे. जीवनांतलें मांगल्य, जीवनांतलें सत्य, जीवनांतलें सौंदर्य हीं उदात्ततेचीं विविध स्वरूपें होत.

बखरीचा कोणताहि प्रकार घेतला तरी तो उदात्त स्वरूपाचा आहे असेंच दिसून येईल. शिवाजीसारख्या आदर्श वीरपुरुषाचें चरित्र, वसईचा दुर्धर संग्राम, पानिपतची घटना, खर्ड्याची स्वारी हे उदात्त विषय नाहीत असें कोण म्हणेल? बहुतेक बखरींचे विषय हे मुळांत उदात्त स्वरूपाचे असल्यामुळें त्यांबद्दल आकर्षण वाटतें.

विषयांच्या उदात्ततेप्रमाणे त्याची मांडणी हीहि तितक्याच उदात्तपणाने झालेली मराठी बखरींत दिसून येते. मराठेशाहीवर हर्षामर्षाचे जे विविध प्रसंग आले त्यांचें निवेदन बखरनवीस उदात्ततेची एक विशिष्ट उच्च पातळी ठेवून करतो. लेखकाच्या भावनोत्कटतेला संयमाचें बंधन असल्यामुळे व लेखनांत औचित्य राखल्यामुळे त्यांतील उदात्ततेचें स्वरूप उज्ज्वल झालेलें आहे.

करुणजन्य विनोदी प्रसंगांतहि उदात्तता कशी आहे यांचें उदाहरण म्हणजे भाऊसाहेबांच्या बखरींतील पुढील उतारा पाहा :

"पुढे एक दोन दिवस जाहले तों इकडे गोविंदपंत बुंदेले यांचें शीर कापून नेलें होतें, (तें) शीर व वकील व पत्रें भाऊसाहेब याजकडे पाठविलीं कीं, 'तुमचे गोविंदपंत पुढे तुम्हास स्वर्गी जागा पाहावयास गेले आहेत. आणि तुम्हास न्यावयासि शीर पाठविलें आहे. होय की न होय हें पाहावें' म्हणोन तें शीर व पत्रें भाऊसाहेब याजकडे वकील घेऊन आले; रुमालांतून शीर पुढे ठेवून पत्रें हातीं दिलीं. भाउसाहेबांनीं पत्रें वाचून पाहून त्यांतील गर्भभाव ध्यानांत आणिला. गोविंदपंत बुंदेले यांचें शीर ओळखिलें. ते समयीं कचेरीस लहानथोर सरदार होते त्यांच्या मुखश्रिया उतरल्या. तमाम लष्करांत खबर कळताच फौज थोडीबहुत हिंमत धरून होती त्यांचीं अवसानें गेलीं. इकडे भाऊसाहेब याणी पत्राचें उत्तर दिलें की, 'तो जागा सर्वत्रांचा आहे. त्याशिवाय दुसरी गती कोणती आहे? प्रस्तुत तुम्ही थोर खंदारचे पातशाहा, तुम्ही तेथे जाल तेव्हा तुमचे स्वरूपाप्रमाणे मान जाला पाहिजे,' म्हणोन तुमचे मेजवानीचे तरतुदीस्तव पुढे गोविंदपंत बुंदेले साहित्यास गेले आहेत.' म्हणोन उत्तर दिलें. शीर होतें तें ठेवून घेतलें त्यास अग्रप्रसाद दिला."[१२]

बखरकाराची लेखनप्रेरणा ही मुळांतच उदात्त असल्याने त्याचें वरील लेखन या उदात्ततेंत न्हाऊन निघालेलें आहे.

मराठी बखरलेखन हें उदात्त व भव्य स्वरूपाचें आहे यांत सुतराम् संदेह नाही.

### वैचारिक क्रम

शैलीचें वैशिष्ट्य म्हणून लेखनांतल्या वैचारिक क्रमाचें विशेष महत्त्व असतें. वैचारिक क्रम हा लेखकाच्या तर्कपद्धतीवर अवलंबून असतो. एकाच विषयावरील अनेक लेखकांच्या लेखनांत वैचारिक क्रमाचा भिन्नपणा आढळतो. याचें कारण म्हणजे प्रत्येक लेखकाची

१२. भाऊसाहेबांची बखर (साने, १९३२) पृ. १३७.

पृथगात्मता हें होय. या पृथगात्मतेमुळे त्या त्या लेखनांत नावीन्य निर्माण होतें. लेखनांतील विचारांची सूत्रता व नावीन्यानिर्मिति यांमुळे वैचारिक क्रम हा शैलीगुण मानला जातो.

बखरींतील वैचारिक क्रमाचा विचार केल्यास असें दिसून येईल की, बखरींचें लेखन हें एकसूत्र आहे. सामान्यतः भावनांच्या उत्कटतेंत व आवेशाच्या गतिमानतेंत वैचारिक क्रम राहणें कठीण असतें; परंतु मराठी बखरी त्याला अपवाद दिसतात. भावनांचा तोल सुद्धां न देतां विचारांची एकसूत्रता साधणें ही अत्यंत अवघड कला आहे. मराठी बखरकारांनी या कलेंत निश्चितपणें यश मिळविलेलें आढळतें. एवढें मात्र खरें की, कित्येक ठिकाणीं घटनांचा पौर्वापर्य न साधल्यामुळे कालविपर्यासाचा दोष निर्माण झालेला आहे. विषयाची आत्मीयता व निवेदनाचा प्रामाणिकपणा हे बखरलेखकांचे गुण मान्य केले तर पौर्वापर्याच्या क्रमभंगाचा दोष क्षम्य ठरेल.

वैचारिक क्रमाच्या दृष्टीने नाना फडणिसांच्या आत्मचरित्राची सुरुवात उल्लेखनीय आहेः—

"श्रीसांबसदाशिवाय नमः जो सांबसदाशिव कसा आहे की, सत्स्वरूप म्हणजे असे चित्स्वरूप प्रकाश अवस्था-त्रय साक्षी जागृत काली त्यास विश्व स्वप्रकाशी तैजस सुपुप्तिकालीं प्राज्ञ असे त्यास म्हणतात, तो एकच आत्मा उपाधिभेदेंकरून नानाप्रकारें भासतो. पाय नसता चालतो, डोळे नसता पाहतो. हात नसता घेतो, कान नसता ऐकतो. सर्वांतर्यामी व्यापक हें कशावरून ? व आत्मा आहे हें कशावरून ? तर दूर कोणी इंगितज्ञ बसला असतो त्याचा याचे आत्म्यांत ( आरशांत ) प्रतिबिंबित होऊन तीच गोष्ट घेतो. व्यापकते-व्यतिरिक्त कसें घडेल, असा आत्मा त्यासच आपणांत विसरून आनंदस्वरूप सोडून दुःखांतील सुख भोगावयाची इच्छा धरितो. हेच या आत्म्याची माया."[१३]

उपरिनिर्दिष्ट वर्णनांत विचारांची मौलिकता व त्यांचा क्रम हीं दोन्ही एकजीव झाल्या-मुळे त्यांत सौंदर्य निर्माण झालेलें आहे.

बखर-लेखकांनी वैचारिक क्रमाचें सूत्र पाळण्याचा कसोशीने प्रयत्न केल्यामुळे त्यांच्या लेखनांत प्रमाणबद्धता दिसून येते. म्हणूनच बखरी वाङ्मयदृष्ट्या सरस ठरतात.

## पारिभाषिक शब्द

भाषेंतील शब्दसंपत्तीच्या दृष्टीने पारिभाषिक शब्दाचें कार्य फार मोठें आहे. एखाद्या नव्या कल्पनेचा निदर्शक असा पारिभाषिक शब्द भाषेंतील शब्दसंपत्तींत निश्चित भर घालतो. पारिभाषिक शब्द हे कोणत्याहि भाषेंतील असले तरी ते उच्चारसुलभ व स्पष्टार्थक्षम असतील तर त्यांचा स्वीकार करणें इष्ट होईल. सुबोधता किंवा स्वाभाविकता हें शैलीचें खरें स्वरूप असेल तर तें पारिभाषिक शब्दांनी व्यक्त होतें यांत शंका नाही.

मराठी बखरींचा विचार केल्यास परकीय म्हणजे फारसी, अरबी, तुर्की वगैरे भाषांतील कित्येक पारिभाषिक शब्द अर्थव्यक्तीच्या दृष्टीने उपकारक झाल्याचें दिसून येतें. राज्य-शासनांतील कित्येक संज्ञा मराठ्यांनी मुसलमानांकडून उचलल्या आहेत हें ऐतिहासिक सत्य होय. बखरलेखनांत राजकीय इतिहास असल्यामुळे राजकारणांतील विविध कल्पना परकीय पारिभाषिक संज्ञांच्याद्वारे मराठींत येऊन ती संपन्न झालेली आहे.

मराठी बखरींतील विषयवार कांही पारिभाषिक शब्द खालीलप्रमाणे आहेतः

१ युद्धविषयक—अराबा ( अ. ), तोफखाना ( अ. ), जंबुरा ( फा. ), बख्तर (फा.)

२ आरमारविषयक—गलबत ( फा. ), गुराबा ( अ. ), तरांडें ( सं. )

१३. ऐतिहासिक पत्रें यादी वगैरे ( १९३० ) पृ. १७३.

३ दस्तऐवजविषयक:—वाका ( अ. ), कैफियत ( अ. ), दफातें ( अ. )
४ न्यायमनसुबाविषयक:—अर्ज ( अ. ), फैसला ( अ. ), जमानत ( अ. ), कजिया ( अ. ), दस्तखत ( फा. ) इत्यादि.

शैलीचें एक अंग म्हणून पारिभाषिक शब्दांनी बखरींतील भाषेस एक विशिष्ट वळण लावलें आहे. मराठी बखरींचें वैशिष्ट्य असें की, कित्येक पारिभाषिक शब्द येऊनहि त्यांतील वातावरण शुद्ध मराठमोळ्याचें राहिलें आहे. महिकावतीच्या बखरींत राजवाड्यांनी अशा पारिभाषिक यावनी शब्दांची यादी दिली आहे ती या संदर्भात उल्लेखनीय होय.

## व्याकरणविशेष

व्याकरणदृष्ट्या बखरींचे पुढील कांही विशेष आहेत :

१ तृतीयान्त कर्त्याच्या वाक्याचा कर्तरि प्रयोगांत शेवट. उदा.—त्याणी प्रत्योत्तरे हाजरतीचे मर्जीमाफक हिंदुधर्मस्थित बोलले. ( शिवाजीप्रताप ).

२. प्रथमान्त कर्त्याचें वाक्य कर्मणिप्रयोगांत. उदा.—मग भाऊसाहेब जातीने गोपिकाबाईकडे जाऊन पदर पसरून साष्टांग नमस्कार घालून प्रार्थना केली. ( होळकरांची कैफियत ).

३. पंचमीच्या ऐवजी तृतीयेचा उपयोग. उदा.—राजगडने रायगडास आले. ( सप्तप्रकरणात्मक चरित्र ).

४. संस्कृतप्रमाणे विशेष्याची विभक्ति सर्वनामांना. उदा.—त्यांत राज्यांत बहुत रितीने मर्यादेने पाये घालून चालतात. ( सदर ).

५. अनेकवचनी कर्ता असून एकवचनी क्रियापद. उदा.—तुम्ही माझे मनांत भ्रांत घालूं नको. ( साष्टीची बखर ).

६. एकवचनी कर्ता असून अनेकवचनी क्रियापद. उदा.—तात्यासाहेब यांची स्वारी कोलवाडच्या कलवी होसहालीचे वाटेने सावसीजवळ गुंगीहालपर्यंत आले. ( पटवर्धनी वाका ).

७ विशेष्यानंतर विशेषणाची योजना. उदा.—नारींनी मंगलआर्त्या अगणित उजळून राजियास वंदिले. ( सभासदाची बखर ).

८. शब्दयोगी अव्ययाची शब्दाअगोदर योजना. उदा.—सुद्धा फौज व तोफखाना. ( सरदार गोखले यांची कैफियत ).

९. वर्तमानकाळाचा भूतकालार्थी उपयोग. उदा.—वाजंत्र्याचे बाजे होतात, चौघडे वाजतात. ( पेशव्यांची बखर–सोहनीकृत ).

१०. स्वार्थी प्रत्ययाचा संकेतार्थात्मक उपयोग. उदा. असे करिता तुम्हास कोणी मदत न करी, तरि कांही मोगलाई मसलत करून तुम्ही यश संपादावें. ( भाऊसाहेबांची बखर).

वर उल्लेखिलेल्या वैशिष्ट्यांखेरीज कर्त्याशिवाय वाक्यरचना, क्रियापदाशिवाय वाक्य, उभयान्वयी अव्ययापासून वाक्याची सुरुवात, ' की ' च्या ठिकाणीं ' जे ', स्त्रीलिंगी तृ. पु. सर्वनामाच्या ऐवजी नपुंसकलिंगी तृ. पु. सर्वनामाचा उपयोग, प्रथमार्थी तृतीया, षष्ठ्यर्थी चतुर्थी, फार्शी शब्दाला संस्कृत प्रत्यय, तर-तरी या अव्ययांचा विरोधार्थक व संकेतार्थक प्रयोग, ' कीं ' व ' म्हणोन ' यांचा कारणबोधक उभयान्वयी अव्ययाप्रमाणे उपयोग, विविध अर्थी ' तों ' या अव्ययाचा वापर इत्यादि आणखीहि बखरीचे विशेष सांगतां येतील. अर्थहानि होऊं न देतां या व्याकरण-विशेषांनी भाषासौंदर्य निर्माण केलें आहे. हें व्याकरण-विशेष म्हणजे मराठी बखरींचें वैशिष्ट्य होय.

मराठी बखरींच्या बाबतींत दैवदुर्विलास असा की, बहुतेक बखरींचीं मूळ हस्तलिखितें उपलब्ध नसून त्यांच्या नकला उपलब्ध आहेत. मूळ हस्तलिखिताच्या अभावीं त्यांच्या नकलां-

वरून तारतम्य पाहून बखरींचें वाचन व प्रसिद्धीकरण झालेलें आहे. बखरींच्या पिढ्यान्‌पिढ्या होणाऱ्या नकलांत नकलाकारांनी केवळ व्याकरणाच्याच चुका केल्या असण्याची शक्यता नाही, तर कित्येक वेळां मूळ मजकुरांत त्यांनीं स्वरचित भागहि घातला असणें शक्य आहे. त्यामुळे कोणत्याहि बखरीचें मूळ समजणें कठीण झालें आहे. अशी स्थिति असली तरी सामान्यतः बखरींवरून तत्कालीन वाक्प्रचार, भाषाप्रयोग इत्यादिकांची कल्पना येते.

**निष्कर्ष**

शैलीविषयक प्रत्येक प्रमुख तत्त्वाच्या कसोटीला बखरवाङ्मय कसें उतरतें हें आपण पाहिलें. त्यावरून शैलीगुणाच्या दृष्टीने बखरसाहित्य समृद्ध आहे असें दिसून येतें. बखरींचें लेखन हें माधुर्य, ओजस्विता, स्पष्टता, संयमितत्व इत्यादि आंतरिक गुणांनीं नटलेलें आहे. वर्ण्यविषयाशीं तादात्म्य व निवेदनाचा प्रामाणिकपणा यांमुळे बखर-लेखन जिवंत वाटतें. बखरगद्यांत व्यक्त झालेल्या भावना उदात्त आहेत. यामुळे बखरींचें एकंदर स्वरूप स्फूर्तिदायक व हृद्य झालेलें आहे.

निवेदनकौशल्याची परिसीमा बखरकारांनी गाठली आहे. बखरींतील घटनांत कलात्मक रंग भरण्याचें कौशल्य बखरकारांच्या ठायीं निश्चितपणें दिसतें. आकर्षक वर्णनपद्धति हें बखरी चित्तवेधक होण्याचें प्रमुख कारण होय. बखर-लेखकांच्या निवेदनांत सुसंगति व वैचारिक क्रम साधल्यामुळे त्यांत प्रसाद हा गुण आपोआप निर्माण झालेला दिसतो. निवेदनाची गतिमानता व भाषेचा प्रवाहीपणा या जोड गुणांमुळे बखरी वाचनीय झाल्या आहेत.

आवेशपूर्ण भावनात्मकता ही बखर-लेखनाची मूळ प्रेरणा असल्यामुळे तिचें स्वरूप बखरींत स्पष्ट दिसतें. कोणतीहि व्यक्ति वा घटना असो, तिच्यासंबंधीं बखरलेखकाला आत्मीयता वाटते. मराठ्यांचा पिंड राजकारणावर पोसलेला म्हणून असो किंवा राजकारणाबद्दल मराठ्यांना पोटतिडीक वाटते म्हणून असो, बखरलेखनांत मराठ्यांच्या स्वभावाचीं वैशिष्ट्यें प्रतिबिंबित झालेलीं दिसतात. भावनात्मकता, सडेतोडपणा व पृथगात्मता हें मराठी मनाचें वळण होय. या मनाचा आविष्कार मराठी बखरवाङ्मयांत निश्चित झाला आहे.

केवळ भाषेच्या दृष्टीने विचार केला तर बखरवाङ्मयाने मराठी वाङ्मयाला सुंदर वळण लावलें असें दिसून येईल. परकीय पारिभाषिक शब्द आत्मसात् करून बखरींनी मराठीची प्रकृति सुदृढ केली व अशा रीतीने भाषासमृद्धीस हातभार लावला. मराठी बखरकारांनी एक स्वतंत्र शैली निर्माण केली आहे. मनांतील भाव कलात्मकतेने कसे रंगवावेत हें बखरींच्या शैलीवरून कळून येतें. वाङ्मयाच्या दृष्टीने लेखनाचा हेतु नसतांहि उत्कृष्ट शैलीचें हें साहित्य निर्माण झालेलें आहे. बखरींचें ऐतिहासिक मूल्य कांहीही असो, त्या बाबतींत मतभेदाला बरीच जागा आहे; पण शैलीगुणांच्या दृष्टीने बखरवाङ्मय उच्च दर्जाचें आहे या बाबतींत मतैक्यच होईल. ● ● ●

# साहित्य-समीक्षा

## मराठी छन्दोरचना ( लयदृष्ट्या पुनर्विचार )

मराठी छंदःशास्त्राचा सांगोपांग व चिकित्सक दृष्टीने स्वतंत्रपणें विचार करणारा, कै. डॉ. माधवराव पटवर्धन यांचा 'छन्दोरचना' हा पहिला महत्त्वाचा ग्रंथ होय ! त्यांत विविध पद्यांतर्गत असलेल्या मूलभूत नियमांची आणि सिद्धांतांची सविस्तर चर्चा केलेली आहे. पण त्यांत कांहीं उणीवाहि राहून गेल्या आहेत. म्हणूनच, पद्याचा लयीशीं असलेला अविभाज्य संबंध दाखवून त्या दृष्टीने त्यांनी पद्याची आणि लयीची जी परिभाषा केलेली आहे ती अव्याप्त असल्याबद्दलचा आक्षेप टीकाकारांनी घेतला.

पटवर्धनांची लयीची कल्पना आवर्तनांतर्गत असल्यामुळे, त्या परिभाषेच्या कक्षेंत वैदिक छंद, अनावर्तनी वृत्तें, ग्रांथिक ओवी हीं येऊं शकलीं नाहीत; पण प्रस्तुत ग्रंथांत डॉ. ना. ग. जोशी यांनी लयीचा अर्थ अत्यंत व्यापक घेतल्याने, तो वरील तिन्ही प्रकारांबरोबरच गद्यशैली-मुक्तशैली प्रकारांनाहि अधिक कसा लागू होऊं शकतो याचें मार्मिक विवेचन करून, पटवर्धनांचा लयसिद्धांतच अधिक स्पष्ट करण्याचा प्रयत्न केलेला आहे. त्या दृष्टीने प्रस्तुत ग्रंथ 'छंदोरचने'ला पूरक अतएव महत्त्वाचा ठरतो.

पटवर्धनांनी आपल्या छंदोरचनेंत जे नियम आणि निरनिराळे पद्यप्रकार सांगितले आहेत, त्यांत थोडाफार बदल अधिक विचारान्तीं त्यांनी आपल्या 'पद्यप्रकाश' या शालेय पुस्तकांत केलेला दिसतो. तेव्हा छंदोरचनेबरोबरच हें पुस्तकहि विचारांत घेणें अवश्य आहे, असें मला वाटतें.

आता प्रस्तुत ग्रंथांतील 'लयी'ची परिभाषा पाहण्यापूर्वी छंदोरचनाकारांची तीबद्दलची परिभाषा अगोदर पाहणें उचित होईल.

डॉ. पटवर्धन यांनी 'पद्य' आणि 'लय' यांच्या व्याख्या पुढीलप्रमाणे केल्या आहेत :

"अक्षरसंख्या आणि लयक्रम या गोष्टींत कांहीं तरी नियम असल्यामुळे जे स्वाभाविकपणेंच अर्थापेक्षा लयीकडे अधिक लक्ष देऊन एकंदरीने सलगपणें, गळ्यावर, कांहीं ठराविकच ठिकाणीं ठराविकच वेळ थांबत म्हटलें जातें तें पद्य होय."

"पद्य हें लिहिल्याप्रमाणें सरळ म्हणत जातांना सारख्या काळांत म्हटल्या जाणाऱ्या अक्षरगटांची जाणीव होऊन सारख्या अंतराने टाळी वाजवीत राहावेंसें वाटतें, हा जो पद्याचा गुण दिसतो त्याला लय म्हणावें." ('पद्यप्रकाश,' पान ७).

या दोन्ही व्याख्यांचा विचार करतां पटवर्धनांना तालबद्धतेंतील लय अनुस्यूत होती, असें दिसतें. लयीच्या या एवढ्याच व्याप्तीमुळे त्यांना अनावर्तनी वृत्तें, वैदिक छंद व ग्रांथिक ओवी यांचें विवेचन या लयसिद्धांतानुसार करणें जमलें नाही व तेवढा भाग वेगळा काढावा लागला.

मराठी छन्दोरचना—[लेखक व प्रकाशक : डॉ. ना. ग. जोशी, एम्. ए पीएच्.डी. पृष्ठें ४७४, मूल्य नऊ रुपये.]



अनुक्रमणिका

ही लयबद्धता केवळ तालांतर्गत किंवा आवर्तनांतर्गत नसून, जींत गतिशीलता आहे व ज्या गतीच्या समतोलपणांतच लयबद्धता सामावलेली आहे ती 'गती'च लयबद्धतेचा आविष्कार आहे—परिणाम आहे—असें सांगतांना, डॉ. जोशी प्रस्तुत ग्रंथांत स्पष्ट करतात की, लयतत्त्व हें गतीशीं अविभाज्यपणें निगडित असतें; या गतीचा संबंध 'स्थल', 'काल' आणि 'शक्ति' यांशीं नित्य येतो. या तीन तत्त्वांची आपसूक आविष्कृत होणारी सुसंगत संघटना हीच लयतत्त्वाच्या बुडाशीं असते, आणि म्हणूनच पद्याचा असाधारण धर्म मानतांना ते म्हणतात

"अक्षरांच्या, कालभाराच्या अनुरोधाने केलेल्या, विशिष्ट परस्परसंमुख योजनेमुळे जी एक प्रकारची 'गति' पद्यांत उत्पन्न होते ती 'गती'च पद्याचें प्राणभूत तत्त्व आहे." ('मराठी छंदोरचना,' पान ४३८).

आता* प्रकाशाची कल्पना येण्यास अंधाराची कल्पनाहि त्याबरोबर यावी लागते. या दृष्टीने डॉ. जोशीकृत व्याख्या गद्याशीं ताडून पाहणें उचित ठरेल.

वर उल्लेखिलेल्या व्याख्येतील ठळक शब्दांवरून, गद्यांत गति उत्पन्न होत नाही, उलट ती पद्यांत होते, म्हणूनच तिला पद्याचें प्राणभूत तत्त्व मानलें आहे, असा अर्थ काढावा काय ? याबरोबरच आणखीहि प्रश्न असे उद्भवतात की, ही गति मुक्तशैलींत उत्पन्न होते म्हणावें तर ती कशी ? गति उत्पन्न होते असें केव्हा म्हणावयाचें ? गति ही केवळ म्हणण्याच्या धाटणींतच–साघात उच्चारणींतच–अनुस्यूत असेल, तर ती गद्यांतहि निर्माण होत नाही काय ? आणि हीच गति जर गद्यांतहि निर्माण होत असेल तर मग हें पद्याचें प्राणभूत तत्त्व कसें ? गद्य आणि पद्य यांतील भेद कोणता ? मुक्तशैलीला पद्य म्हणावें काय ? म्हणावें तर कां ? आणि शेवटीं पद्यशास्त्राच्या मर्यादा कोणत्या ?

डॉ. जोशी म्हणतात त्याप्रमाणे एका अक्षरापासून दुसऱ्या अक्षरापर्यंतच्या अतिसूक्ष्म कालभाराच्या अनुरोधाने चढउतारात्मक–आरोहावरोहात्मक अशी लयीची–गतीची कल्पना घेतली तर आपलें नेहमीचें बोलणें देखील लयबद्धच ठरतें ! आपण जें बोलतों तें सारें वाङ्मयच, असा अर्थ 'वाङ्मय' या शब्दांतून निघतो, पण या शब्दाचा उपयोग करतांना एवढी मोठी व्याप्ति मानली जात नाही; त्यांत मर्यादा असते. हीच स्थिति 'लय' किंवा 'गति' या शब्दाचीहि आहे. 'लय' किंवा 'गति' यास अर्थमर्यादा न घातली तर शास्त्रीय वाङ्मयाशिवाय[1] कथा–कादंबरी–नाटकादि समस्त ललित वाङ्मय या पद्यशास्त्राच्या कक्षेत

१. प्रयत्नेकरून त्यांतहि लयस्पर्शाची जाणीव होऊं शकेल. उदाहरणार्थ, वर * ही फुली दिलेलें वाक्य पुढीलप्रमाणेहि साघात उच्चारणी करून लिहून दाखवितां येईल असें वाटतें :

। प्रकाशाची । कल्पना येण्यास
। अंधाराची । कल्पनाहि
। त्याबरोबर । यावी लागते.

त्याचप्रमाणे पान ३८४ वर मुक्तशैलीच्या उदाहरणादाखल दिलेलें 'कोरकू'तील उद्धरण पुढीलप्रमाणे गद्यसदृशच वाटतें :—

"सातपुड्याच्या परिसरांत लागोपाठ दोन उन्हाळे घालविले आहेत मी ! मनमुराद पाहिली आहे तेथली रम्यभीषण वनश्री; पाहतां येईल तितके पाहिलें आहे तेथल्या कोरकूंचें वन्यजीवनही !"

हा उतारा एखाद्या कादंबरींतील संवादांतहि धकावा !

अनुक्रमणिका

येऊन मोठी अनवस्था होईल; आणि स्वतः डॉ. जोशी यांनीहि मुक्तशैलीचा विचार करितांना खांडेकरांच्या रूपककथा, काणेकर-सानेगुरुजीप्रभृतींचे निबंध हे या प्रकारच्या शैलींत-डोलन-शैलींत-येतात असें म्हटलें आहे. (पाहा-पान ३८०-३८१); त्यामुळे वरील कयासास पुष्टीच मिळते.

गद्य आणि पद्य यांसंबंधीं डॉ. जोशी यांचें मत पुढीलप्रमाणे दिसतें. [ मीं विचारलेल्या शंकेचें त्यांनी मला जें उत्तर दिलें त्यांतील आवश्यक भाग पुढे दिला आहे. ]-

"........मुक्तशैली किंवा गद्यगीत लिहिण्यांतील भावच त्याचा पद्याकडे असलेला कल दर्शवितो. म्हणून तें गतियुक्त, चढउतारांचें, आंदोलनबद्ध गद्य हें पद्याशीं समकक्ष, जवळच्या नात्याचें होतें. केवळ तार्किक मुद्दा स्पष्ट करणारा एखादा परिच्छेद लिहिणें म्हणजे गीत नव्हे; हा भाव असेल तर त्यांत लयबद्धता असली तरीहि त्याला गौण स्थान येईल. 'कहाणी' प्रकार असाच आहे. म्हणून मुक्तशैली-गद्यशैली-ही गद्यपद्यांच्या सीमेवरील दोन्ही बाजूंना मुखें असलेली द्विमुखी देवता आहे. झोक भावकाव्याचा, भाववृत्तीचा असेल तेव्हा त्या शैलीचा अंतर्भाव पद्यरचनेच्या शास्त्रांत करणें अवश्य होय...."

प्रस्तुत ग्रंथांतील पान ३८०-३८१ वर जें विवेचन डॉ. जोशी यांनी केलें आहे, त्यांतहि हाच आशय दिसतो.

परंतु छंदोरचनाकार गद्याची व्याख्या करतांना लिहितात—"अर्थाकडेच लक्ष्य देऊन ठिकठिकाणीं न्यूनाधिक विश्राम घेत जें आपण नेहमीच्या बोलण्याप्रमाणे, आणि केलाच तर स्वरांत किंचित् चढउतार करून उच्चारितों, तें गद्य होय; याउलट पद्यांत अर्थापेक्षा लयीकडे अधिक लक्ष्य दिलें जातें." यांतील ठळक शब्द महत्त्वाचे आणि ग्राह्य वाटतात.

यावरून हें स्पष्टच होतें की, अर्थावाचून भावाभिव्यक्तीची जाणीव होऊं शकणार नाही; आणि भावाभिव्यक्ति जशी पद्यांत होते तशीच गद्यांतहि (कथा-नाट्य-कादंबरी) होते. तसेंच शब्दांचे चढउतार, आरोहावरोह जसे पद्यांत दिसतात तसेच गद्यांतहि दिसतील. तेव्हा पद्य आणि गद्य यांच्या भेदासाठी भावनात्मकतेचें लक्षण मानतां येईल असें वाटत नाही. शिवाय अशा प्रकारें अंतरंग—म्हणजेच तें काव्य आहे की नाही, तींत भावनात्मकता आहे की नाही, इत्यादि—पाहण्याचें काम काव्यशास्त्राचें आहे; पद्यशास्त्राचें नव्हे. पद्यशास्त्राच्या कक्षेंत केवळ बहिरंगच येईल. "आईच्या नवऱ्यास बाप म्हणती, मामा तिच्या बन्धुला" असें कोष्ठकवजा पद्यहि पद्यशास्त्राच्या कक्षेंत येईल; मग काव्यदृष्ट्या त्याला कांही का महत्त्व नसेना !

याशिवाय डॉ. जोशी यांनी दाखवून दिलेली ही लयबद्धता जीवनव्यापी असल्यामुळे, सर्व कलांचेंच ती प्राणभूत तत्त्व आहे. ती चित्र-नृत्य-गान यांप्रमाणेच गद्यांतहि समाविष्ट होते. हीच लयबद्धता पद्यांतहि आहे. तेव्हा इतर कलांपासून—विशेषतः गद्यापासून—पद्य हें वेगळें कसें काढावें ? त्याचें वैशिष्ट्य कोणतें ? त्याचा व्यवच्छेदक गुण कोणता ?

लयतत्त्वाच्या विस्तारवृक्षांत गद्याचें स्थान नेमकें दाखविलेलें नाही. त्या वृक्षांतील पद्य-रचनेचे बद्ध आणि मुक्त असे दोन भाग केल्यानंतर, मुक्त भागांत कथा-कादंबरी-नाटक आदि वाङ्मय येतें, असें लेखकास अभिप्रेत आहे काय ?

आणि अशा प्रकारें घेतलेल्या लयीच्या व्यापक अर्थामुळे वैदिक छंद, अनावर्तनी वृत्तें, ग्रांथिक ओवी, मुक्तशैली इत्यादींचें स्पष्टीकरण झालें म्हणावें तर पद्याचें व्यवच्छेदक लक्षण कोणतें, हा दुसरा महत्त्वाचा (किंवा अ-महत्वाचा) मोठा प्रश्न पुढे उभा राहतो. डॉ. पटवर्धन-कृत लयीची परिभाषा अव्याप्त म्हणावी तर डॉ. जोशीकृत परिभाषा अतिव्याप्त ठरते !

आता तालांतर्गत आंदोलनाच्या व्यतिरिक्त कालभारांतर्गत आंदोलनहि ठिकठिकाणीं प्रतीत होतें, या व्यापक लयतत्त्वाच्या स्पष्टीकरणार्थ डॉ. जोशी यांनी प्राचीन वैदिक-प्राकृतांपासून तों आजच्या मुक्तशैलींतील पद्यरचनेपर्यंत समग्र उपलब्ध वाङ्मयाचें अत्यंत साक्षेपानें आलोडन करून त्या लयतत्त्वाच्या उत्क्रांतीचे-विकासाचे टप्पे दाखवून दिले आहेत; हाच या ग्रंथांतील स्वतंत्र असा भाग आहे आणि याबद्दल ते धन्यवादास खचित पात्र आहेत.

वैदिक छंदांत निश्चित अक्षरसंख्या एवढाच नियम आहे; उच्चारणींतील लघुगुरुभेद तसाच कायम आहे. पण ऋचापाठ करतांना जी ' उदात्त ' व ' स्वरित ' अशी स्वरयोजना केली जाते, तींत कांहीतरी ( निश्चित वा नियमित नसली तरी ) प्रमाणबद्धता जाणवते. हें तत्त्व दृश्य नाहीं; श्राव्य आहे. त्यामुळे यांत असा लयस्पर्श जाणवतो. यांतून अमुक एक प्रकारचा नियम हातीं लागत नाही.

यापुढे वैदिक-प्राकृत छंदांपासून पुढे उगम पावलेलीं, नियमांनी बद्ध असलेलीं वृत्तें उगम पावलीं असा कयास करण्यास जागा आहे. 'वियोगिनी', 'अपरवक्त्र', 'मालभारिणी', 'पुष्पिताग्रा' हीं वृत्तें पुढच्या कवींनी वापरलीं आहेत.

अनावर्तनी वृत्तांत कांही तुकडे स्वाभाविक रीत्या पडतात. या तुकड्यांत लघुगुरूंच्या परस्परसंमुख योजनेमुळे एक प्रकारचें आंदोलन निर्माण होतें ही गोष्ट निश्चित ! आणि यांतूनच निरनिराळ्या प्रकारचीं वृत्तें निर्माण झालीं असावींत. पान १०१ वरील ' शालिनी ' व ' मन्दाक्रांता ' यांचें विवेचन उल्लेखनीय आहे. शालिनीवृत्तांतल्या चतुरक्षरी आणि सप्ताक्षरी चरणखंडांच्यामध्ये एक षडक्षरी घटक वाढवून मन्दाक्रांता वृत्त सिद्ध होतें :

शालिनी :—। मन्दाक्रान्ता । । वृत्त तें मन्द चाले

मन्दाक्रान्ता :—। मन्दाक्रान्ता । म्हणति तिजला । वृत्त तें मन्द चाले.

याबरोबरच, आवर्तनी वृत्तांतील यतिस्थानांवरून ' विद्युन्माला ', ' जलधरमाला ' यांचीं अष्टमात्रक आवर्तनें स्पष्टपणें प्रतीत होतात.

दिण्डींतील षण्मात्रक आवर्तन तर स्पष्ट आहेच, पण ही गेय रचना केवळ आवर्तनापेक्षा अधिक नियमबद्ध दिसते.

छान्दस रचनेंतील अक्षरोच्चार द्विमात्रक कालमानाचा असतो, याचें सयुक्तिक विवेचन ( पान १४४-१४५ ) डॉ. जोशी यांनी केलेलें आहे, तें ग्राह्य वाटतें.

ओवीपेक्षा अभंगांची रचना अधिक रेखीव आणि नियमबद्ध दिसते. त्याचप्रमाणे त्यांत तालबद्धताहि स्पष्टपणें प्रतीत होते. वामनपंडित, रघुनाथपंडित, मोरोपंत आदि पंडितकवींच्या ओव्या बऱ्याच प्रमाणांत रेखीव आहेत. पण ज्ञानेश्वर, नरेन्द्र, मुकुन्दराज, मुक्तेश्वर आदींच्या ग्रांथिक ओव्यांत हा लयसिद्धांत ओढूनताणून लावण्याचा प्रयत्न दिसतो ! केवळ थोडें गळ्यावर म्हटल्यामुळे त्यांत लय असेल असें तर वाटलें नसेल ? आमच्या येथील ह. भ. प. ढोलीबुवा महाराजांचें आणि इतर कित्येक हरिदासांचें कीर्तनांतील सबंध गद्य-निरूपण थोडें गळ्यावर होतें. त्यांतील लयबद्धता कशी जाणावी ? त्याचप्रमाणे ग्रांथिक ओवीला पद्य कां म्हणावें हेंहि समजत नाही.

यापुढील भक्तिपर पद्यप्रकार, शाहिरी पद्यप्रकार आणि लौकिक पद्यप्रकार हीं सर्वच प्रकरणें स्वतंत्रपणें विचार करणारीं आहेत. त्यांतील आवर्तनात्मक लयसिद्धांत स्पष्ट करण्यासाठी दिलेलीं सर्वच प्रकारचीं उदाहरणें योग्य आणि महत्त्वाचीं वाटतात.

यानंतरचें प्रकरण मुक्तछंद–मुक्तशैलीविषयींचें ! मुक्तछंदांतली आवर्तनात्मक लय स्पष्टच आहे. पण मुक्तशैलीबद्दल पद्यशास्त्राच्या कक्षेंतून बोलावयाचें झाल्यास इतकेंच म्हणावेंसें वाटतें की, सामान्यतः कालभारात्मक उच्चारणी ही मराठीची प्रकृति नाही.

असा हा लयतत्त्वाच्या विकासाचा इतिहास आहे.

पोवाडे, लावण्या, भक्तिपर पद्यें आदि वाङ्मयाचें परिशीलन करून छन्दोरचनाकाराने उद्धृत न केलेलीं पण निराळी मोडणी व वैचित्र्य असलेलीं उदाहरणें डॉ. जोशी यांनी प्रस्तुत ग्रंथांत दिलेलीं आहेत व जरूर तेथे नांवेंहि सुचविलेलीं आहेत; तीं बहुतेक योग्यच आहेत. पण चरणनिर्णय, ध्रुवपद, अन्तरा, निरक्षर मात्रांची प्लुति वगैरे बाबतींतलीं डॉ. जोशी यांचीं स्पष्ट मतें प्रस्तुत ग्रंथांत नसल्यामुळे मतभेदाला जागा झाली आहे.

(१) पान २३३ वर, ध्रुवपद 'कर्णफुल्ल' जातीचे, अंतरा 'पादाकुलका' चा व अंतरा व ध्रुवपद यांना जोडणारा चरण 'अचलगति' अशी संमिश्र रचना 'छंदोरचने'त नाही, असें डॉ. जोशी म्हणतात.

पण ध्रुवपद हें जातिप्रकाराचें निर्णायक नाही व या वेळीं अंतऱ्याचाहि विचार करावयाचा नसतो, असें छंदोरचनाकार म्हणतात. अंतऱ्याची स्पष्ट कल्पना डॉ. जोशी यांनी दिलेली नाही. उपर्युक्त पादाकुलक हा वस्तुतः कडव्यांतील भाग आहे; अंतरा नाही. अंतरा कडव्याच्या पोटांत असतो. अंतरा आणि ध्रुवपद असलेलें पद्य वैचित्र्य म्हणून मानावें हें बरें ! याशिवाय पादाकुलक अनेक व अचलगति एक, या संयुक्त मोडणीचा उल्लेख 'पद्यप्रकाश' पान ९४ वर 'प्रणयप्रभा' जाति म्हणून केलेला आहे. तेव्हां डॉ. जोशी म्हणतात त्याप्रमाणे वरील संमिश्र रचनेला निराळें मानण्याचें कारण वाटत नाही.

(२) पान २९८ वर [ – – । प । – + ] या मोडणीस "जिजा" हें नवें नांव डॉ. जोशी यांनी दिलें आहे. 'पद्यप्रकाश' पान ९८ वर वधूवल्ली आणि भवबंध या जातींचें लक्षण सांगतांना याच मोडणीस 'देवीवर' हें नांव पद्यप्रकाशकाराने यापूर्वीच दिलें आहे. 'छंदोरचने'तहि पान ५२२ वर छांदस देवीवरची अशीच मोडणी दिली आहे. त्यावरून मात्रिक देवीवरहि होतो. अशा स्थितींत उपर्युक्त नवीन नांवाची आवश्यकता वाटत नाही.

(३) पान २४१ वरील "असा धरि छन्द........." ची मोडणी वैकल्पिक म्हणणी-प्रमाणें [ – – । प । – + ] देवीवर अनेक [ क । – + ] एक अशीहि होते [ पाहा–'पद्यप्रकाश', पान ९८ ]. म्हणणीची रूढ पद्धतहि बहुतेक अशीच वाटते.

(४) पान २६६ वर "... ..शिवाय ही 'जाति' सुंदरी झाली असती, तें 'वृत्त' असतें" असें डॉ. जोशी म्हणतात. पण छंदोरचनाकाराने वृत्त व जातिनामांत घोटाळा होऊं नये असें म्हटलें आहे [पाहा–'छंदोरचना', पान ३६१ ]. "सुंदरी" हें वृत्तनाम डॉ. पटवर्धन यांनी स्वीकारलें नाही हें खरेंच ! तरी जाति आणि वृत्तनामांत घोटाळा होऊं नये म्हणून काळजी घेण्यासंबंधाचें त्यांचें मत योग्य वाटतें.

(५) पान ३२५ वरील शेवटल्या ओळीचें वैकल्पिक रीत्या पुढीलप्रकारे विश्लेषण करावें लागतें :

सर् सर् । गोविन्दा ऽऽ । ये ऽऽ तो ऽऽ । ऽऽऽ

आणि यामुळे चरणांतीं आवर्तनाच्या प्लुतीनंतरहि सहा निरक्षर मात्रांची आणखी प्लुति घ्यावी लागते. चरणांतीं विराम झाल्यावर त्यापुढे आद्यतालकपूर्व गणापूर्वी निरक्षर मात्रांची प्लुति नसावी हें छंदोरचनाकाराचें म्हणणें योग्य वाटतें. त्या दृष्टीने वरील पद्य 'अचलगति' च मानणें बरें !

( ६ ) पान ३२८–३२९ शेवटली ओळ : पादाकुलक अनेक व अचलगति एक ही संयुक्त रचना 'पद्यप्रकाश' पान ९४ वर ' प्रणयप्रभा ' म्हणून दिली आहे. 'छंदोरचना' पान ४६० व 'पद्यप्रकाश' पान ९२ वर श्यामाराणीचें लक्षण पादाकुलक अनेक व हरिभगिनी एक असें सांगितलें आहे. पण 'छंदोरचनें'त दिलेलें उदाहरण मात्र प्रणयप्रभेचें वाटतें. छांदस प्रणयप्रभा म्हणजे घनाक्षरी असें पद्यप्रकाशकार म्हणतात. त्यावरून " अशी लवे तशी लवे.........." हा प्रणयप्रभा छंद मानणें उचित होईल; डॉ. जोशी म्हणतात त्याप्रमाणे श्यामाराणी नव्हे.

अशा प्रकारें तपशिलाबाबत स्थूल मतभेद होण्यासारखा आहे. त्याचप्रमाणे, पद्याचा लयीशीं अत्यंत घनिष्ठ असलेला संबंध नाकारतां येत नसला, तरी लयीच्या स्वरूपाची स्पष्ट कल्पना अजून होत नाही असें म्हणावेंसें वाटतें. लय तालांतर्गत मानावी तर अव्याप्ति होते आणि ती कालभारांतर्गत मानावी तर अतिव्याप्ति होते; आणि या व्यापक लयतत्त्वानुसार गद्यपद्यभेद काढून टाकावा लागेल; समस्त वाङ्मय पद्यरचनेंत अंतर्भूत करावें लागेल. शिवाय लय ही श्राव्य असल्यामुळे थोडी गळ्यावर म्हणणी केली तर ती गद्यांतहि दाखविणें शक्य होईल आणि पद्य हें सरळ गद्याप्रमाणे वाचलें तर त्यांत लय असूनहि ती प्रतीत होणार नाही.

बहुतेक सर्वच शास्त्रें प्रयोगशरण आहेत. त्याला छंदःशास्त्रहि अपवाद नाही. या निरनिराळ्या प्रयोगांवरून नियम बनवितांना कोणत्या जुन्या नियमांना चाट द्यावी हेंहि ठरवावें लागतें. त्या दृष्टीनेहि छंदोरचनेची पुनर्घटना व्हावी असें आता वाटूं लागलें आहे. या प्रयोगांपैकी छंदःशास्त्रांत मज्जाव कुणाला आणि कां करावा असा प्रश्न जर उपस्थित होत असेल तर सर्वच प्रयोगांचें ( मग ते कसेहि असले तरी, परस्परविरोधी नियम ठरवूनहि ) स्वागत करून छंदःशास्त्रांत स्थान द्यावें की काय आणि कां हाहि प्रश्न आहेच. यांतील इष्टानिष्टतेचा विचार छंदःशास्त्रज्ञ करतीलच.

तरीहि लयसिद्धांत अधिक विस्तृतपणें चर्चिणारा हा मोठा ग्रंथ डॉ. जोशी यांनी केलेल्या परिश्रमाची साक्ष देतो आणि तो संदर्भ-ग्रंथ म्हणून मान्यता पावण्याच्या योग्यतेचाहि आहे. ही मोलाची भर मराठी साहित्यांत घालून एक नवा दृष्टिकोन दाखविल्याबद्दल डॉ. जोशी यांचें मी मनःपूर्वक अभिनंदन करतों. ● ● ●

निशिकान्त करकरे

## सावली ( काव्यसंग्रह )

श्री. सूर्यकांत खांडेकर हे प्रामुख्याने प्रेमकवि आहेत. कै. माधवराव पटवर्धन यांनी विरहतरंगाच्या प्रस्तावनेंत ' क्षणिक कौतुकापासून ते अनन्यभावाच्या आमरण वेडापर्यंत आणि निष्काम सेवकत्वापासून ते मत्सरी प्रभुत्वापर्यंत भावनेच्या सर्व छटा प्रेम शब्दाने व्यक्त होतात' असें म्हटलें आहे तें श्री. सूर्यकांत खांडेकरांच्या कवितेंतहि प्रत्ययास येतें. उत्कट अनुभूति व व्यापक सहानुभूति या दोहोंचेंहि दर्शन त्यांच्या काव्यांत होतें. प्रेम या भावनेचें स्वरूप किती व्यापक आहे हें जाणून घेऊनच मग खांडेकरांच्या प्रेमकाव्याकडे पाहावें. ' सुखदुःखाच्या हिंदोळ्यावर असेंच आंदोलत मम जीवित.' सुखदुःख, आशानिराशा, यांसारख्या द्वंद्वांमधून

सावली—[ कवि : सूर्यकांत खांडेकर, एम्. ए. प्रकाशक : माधव बा. घोरपडे, C/o ९८३ए शिवाजी पेठ, कोल्हापूर. पृष्ठें १२०, किंमत २ रु.]

त्यांच्या जीवनाचा ओहोळ वाहतो आहे. कधी स्नेहाचा वर्षाव व वात्सल्याची हिरवळ यांचा अभाव, कधी दुष्ट नियतीच्या खेळाने हरपलेले जरतारी क्षण, कधी व्यवहाराच्या बाजारांत चाललेली सौंदर्याची उपेक्षा, कधी अन्हेराचा वार, कधी उद्ध्वस्त झालेलें प्रीतीचें राऊळ इत्यादि अनेक अनुभवांमुळे त्यांचें मन निराश बनतें व अंधारीं फिरणारा अंधारांतला चिर-प्रवासी अंधारांतलीं काळीं गाणीं ओठांमध्ये साठवितो. ' भग्नाश मी येथ झुरे, कोण पुसतो दुःखांत ? ' ठराविक चाकोरीमुळे, जीवनांत कांही नवीन न घडल्यामुळेहि कवीस उद्विग्नता वाटते. पण ही निराशा व उद्विग्नता हा कांही खांडेकरांच्या कवितांचा स्थायीभाव नव्हे. तो क्षणिक भावनेचा उद्रेक आहे. त्यांचा आशावादहि जबर आहे.

क्षणक्षण जीवनाचा मला जिंकायाची आस
रोज नवी अनुभूति रोज नवीन साहस

किंवा

ठेंचाळत परि पुढें पुढें मज पार जायची हांव

किंवा

ढळूं नको तूं रुद्रापरि जा तरिही गर्जत पुढें

असा त्यांचा स्वमनाला आदेश आहे.

आपल्या जीवनांत काजळी ओतणाऱ्या निराशेचा बळी घेण्यासाठी आपण सामर्थ्यशाली सूर्य व्हावें असें त्यांस वाटतें. सूर्य होण्याची महत्त्वाकांक्षा धरणाऱ्या कवीस निराशावादी कोण म्हणेल ? आशा व निराशा यांचा मनोहर लपंडाव श्री. सूर्यकांत खांडेकरांच्या काव्यांत दिसतो, पण शेवटीं आशेनेच डाव जिंकला आहे.

कोणत्याहि भावनाप्रधान कवीच्या काव्यांत त्याच्या भावनांचें स्वच्छ प्रतिबिंब पडलेलें असतें. खांडेकर तरी त्यास कसे अपवाद ठरणार ? गोविंदाग्रजांच्या काव्यावरून त्यांच्या प्रेमाचा इतिहास अजमावतां येतो. सूर्यकांत खांडेकरांच्या काव्यावरूनहि तसें करतां येईल. अर्थात्, हें प्रेम प्रत्यक्षांतलें असेलच असें नाही. प्रारंभीं कोणावर तरी प्रेमाचा वर्षाव करण्याची इच्छा, अशी व्यक्ति दिसल्यास झालेला उत्कट आनंद, ती व्यक्ति आपल्या भावनांस प्रतिसाद देईल का या शंकेने वाटणारी हुरहूर, प्रेमसाफल्याच्या कल्पनेने स्वतःवर पाखडलेली धन्यता व शेवटीं प्रेमसाधनेंत यश न मिळाल्यामुळे वांट्यास आलेली दारुण निराशा इत्यादि अनेक छटा खांडेकरांच्या कवितेंत दिसून येतात. सखीची ओळख होतांच त्यांना वसुंधरा जिंकल्यासारखें वाटलें. तिच्या एका शब्दाने स्वर्ग हातीं आल्याचा भास होतो. मुक्या जिवाचें लाडकें गुपित तिला कसें कळावें याची खंत वाटते. तें गुपित सांगण्याचा प्रयत्न तोटकाच पडतो. ' झुरत जळत राहिलों परस्पर. ' पण नंतर तें गुपित डोळ्यांमधूनच प्रकट झालें. कवीस प्रेमसाफल्याचा आनंद मिळाला; पण त्याच प्रेयसीने ' मला विसरून जा ' म्हटल्याबरोबर कवीचें मन बधिर झालें. भावना जळून खाक झाल्या व प्रीतीचे अंकुर जळाले. हृदयमंदिरांतील देवतेची मूर्ति अंतर्धान पावली.

' प्रीति निमाली आणि राहिल्या, मागे केवळ जळक्या छाया '—मरण्यासाठी असलें जगणें मागे उरलें असें त्यांस वाटूं लागलें. कित्येक वेळीं नकार देणाऱ्या प्रेयसीचाहि त्याला संताप आला व ' कशी घालिते मोह मना तुज दीडदमडिची पोर ' असा प्रश्न सात्त्विक संतापाने तो आपल्या मनास विचारूं लागला. इतर अनेक कवींप्रमाणे आपलें प्रेमहि उदात्त (Platonic Love) आहे असें खांडेकरांसहि वाटतें. 'उदात्त माझें प्रेम खरोखर, बंधन त्याला पार्थिवतेचें', 'मनामनाचें अपुल्या मीलन, शरीररूपें आज घडावें ', ' ते भाव खरोखर सात्त्विक अन् निष्पाप,

तूं सांग मंगले शिवेल का मज पाप ? ' इतकें सात्त्विक, उत्कट, मंगल प्रेम असूनहि तें अयशस्वी व्हावें, याचें कवीस सविस्मय दुःख वाटतें. जीवनांतील अनेक दुःखें, अपमानाचे काळेकुट्ट प्रसंग केवळ प्रेयसीमुळेच कवीस सुसह्य झाले. पण आता तोहि आधार गेला. निराश मनाला शांत करण्याची संजीवनी प्रीतिभावनेंत असते. त्यामुळे 'एकलेपणाहुन प्रेमनिराशा बरी' असें कवीस वाटतें. प्रेमनिराशा होऊनहि कवि स्वतःचें कसें समर्थन करतो पाहा. कदाचित् प्रेमनिराशेचें हें उदात्तीकरण (Sublimation) तर नसेल ? माझ्या मतें खांडेकरांच्या कवितांचें सौंदर्य त्यांच्या सरल प्रेमभावनेच्या या मोहक आविष्कारांत आहे.

श्री. सूर्यकांत खांडेकरांचीं वर्णनें रेखीव, सुस्पष्ट व चित्रात्मक असतात. विशेषतः स्त्री-सौंदर्याचें वर्णन करतांना त्यांत आलेल्या मादक उत्तानतेमुळे कित्येक कवितांस शाहिरी थाट लाभला आहे. ' नवखे वारे, ' ' प्रीत पांखरा, ' ' स्वर्गपरी, ' ' वनराणी तूं ' या कविता त्या दृष्टीने वाचनीय आहेत. या वर्णनांत उत्तानता असली तरी अश्लीलता नाही हा त्या कवितांचा एक उल्लेखनीय विशेष आहे.

स्नेह्यांबद्दल प्रेम, माता-पित्यांबद्दल सादर भक्तिभाव, नम्रता, सौंदर्याबद्दल आसक्ति, अन्यायाबद्दल चीड, उपकर्त्यांबद्दल कृतज्ञता इत्यादि विविध भावनांचें प्रासंगिक दर्शनहि त्यांच्या काव्यांत घडतें. 'कृतज्ञता', 'दैवत', 'सावली' या कविता वाचून पाहाव्या. ' माझ्या घरट्यांत ' व ' महाविद्यालयीन जीवन ' या दोन कविता माझ्या मतें अत्युत्कृष्ट आहेत. महाविद्यालयांत चार वर्षे हसतखेळत घालवून निरोप घेतेवेळीं मनांत गर्दी करणाऱ्या संमिश्र भावनांचें चित्रण हळुवारपणें पण प्रभावीपणें यांत झालें आहे—

या इथेंच सरलीं क्षणांत वर्षे चार
जायचें कुठें तरि चार दिशांना चार
एकत्र खेळलों, हसलों आपण सारे
तरुलता मित्रहो ! आठव ठेवा हृदयीं
स्मृतिगंध दरवळो सदैव तुमच्या ठायीं !

या पंक्ति वाचतांना कोणाचें मन भरून येणार नाही ?

' माझ्या घरट्यांत ' ही कविता म्हणजे नाद, अर्थ व माधुर्य यांना त्रिवेणी-संगमच आहे. या स्थानीं एक सूचना नमूद करावीशी वाटते. ' हायस्कूलच्या परिसरांत ' ही कविता वगळल्यास संग्रहाच्या सौंदर्यांत भर पडेल, असें वाटतें. खांडेकरांच्या भावपूर्ण कवितांशीं ही विसंगत वाटते.

अद्‌भुतरम्यतावादी (Romantic) कवींच्या कांहीं वृत्तीहि सूर्यकांत खांडेकरांच्या कवितेंत डोकावतात. जगाचा कंटाळा येऊन दूर कुठे तरी एकटेपणीं हिंडावें, कसल्यातरी कैफांत गुंग होऊन राहावें (Escapism), अकारण लागलेली हुरहूर किंवा पर्युत्सुकत्व, निरनिराळ्या रंगसंगतींबद्दल आकर्षण, निराशा व आशा यांचा खेळ, ठराविक चाकोरींतून सुटून अनिर्बंध जीवन जगण्याची तीव्र इच्छा, निसर्गप्रेम इत्यादि प्रवृत्ति आढळतील. ' तूं निळ्या नभांतिल राणी ग ' ही कविता त्यांचें रंगाबद्दलचें आकर्षण दर्शविते.

एखाद्या कुलीन, अभिमानी, मराठमोळा कन्येप्रमाणे श्री. सूर्यकांत खांडेकरांची कविता आहे. तिचें सौंदर्य न्यारेंच आहे. तें तिच्या बाह्य मोहकतेंत आहे की आत्मिक सोज्ज्वळतेंत आहे, तिच्या चित्ताकर्षक विभ्रमांत आहे की भावनिक संघर्षांत आहे, हें नेमकें शोधून काढणें सोपें नाही. श्री. माडगूळकर, श्री. बोरकर, श्री. कुसुमाग्रज यांच्या कवितांची मोहिनी खांडेकरांवर दिसते. ' काय वाहूं तुझ्या पदीं ' या कवितेचें ' मी काय तुला वाहूं '

या कुसुमाग्रजांच्या कवितेशीं साम्य आहे. 'चालली वनवासा जानकी' यांतील कल्पना तुलसीरामायणांतील प्रसंगावरून सुचली असावी.

श्री. सूर्यकांत खांडेकरांचें काव्य नवीन आहे, पण नवकाव्य नाही. काव्यप्रांतांत सध्या चालू असलेले नवप्रयोग त्यांच्या प्रतिभेस मानवत नसावेत. अर्थात्, खरें अभिजात सौंदर्य नेहमी नवीनच असतें. खांडेकरांचें काव्य आस्वाद्य आहे. त्यांत प्रतिभेची गगनचुंबी मरारी नाही, निरनिराळ्या तत्त्वज्ञानांची भेसळ नाही, अलंकारांचा बडेजाव नाही, जें आहे तें कोमल, सोज्ज्वल, प्रेमळ. विविध भावनातरंगांचा प्रामाणिक आविष्कार हाच सूर्यकांत खांडेकरांचा विशेष. त्यांच्या कवितांत त्यांचें असें खास वेगळेंपण नसेल, पण त्यामुळे त्यांच्या कवितेच्या आस्वादास बाध येत नाही हें निश्चित. जीवनांतील प्रखर उन्हाळ्यामध्ये रसिक काव्यप्रेमी 'सावली'च्या आश्रयाने शांत होतील अशी खात्री वाटते. ● ● ●

गिरिधर पंडित

## पोरका

'घर' व 'पंख' या कादंबऱ्यांमुळे वाचकांना चांगले परिचित झालेले प्रा. वसंतराव कानेटकर यांची ही कादंबरी वाचकांच्या त्यांच्याविषयींच्या अपेक्षा पूर्ण करणारी आहे; शिवाय लेखकाच्या मनांत भुतांसारख्या वावरणाऱ्या आणि व्यथांचें वादळ उठविणाऱ्या समस्यांनाहि या कथेच्या डोहांत मुक्ति मिळाल्यासारखी झाली आहे. पहिल्या दोन कादंबऱ्यांमध्ये वेड लावणाऱ्या परिस्थितींत भटकणाऱ्या एका व्यक्तीची व एका 'कलावेड्या कलंदरा'ची (पांडू मास्तरांची) अशा दोन ठसठशीत व्यक्तिरेखा कानेटकरांनी रंगविल्या होत्या. अनुभवाने व्यथितचित्त होऊन, दुर्दैवाने घायळ झालेल्यांची गति स्वतः घायल होऊन चित्तांत साठवून, कानेटकर लिहूं लागतात. नाट्यपूर्ण प्रसंगांतून व व्यक्त-अव्यक्त भावनांच्या तरंगांतून माणसांच्या सुखदुःखांना वाचा फोडतात व सुरूप-कुरूप मनांना आकाराला आणतात. पण पहिल्या दोन कादंबऱ्यांची रचना एकेका व्यक्तीभोवती केलेली व सोपी होती; भावव्यक्तीमध्ये उत्कटता होती ती या एकेरीपणाला न झेपणारी असल्यामुळे डोईजड झाली होती. यामुळेच की काय 'संज्ञाप्रवाहा'चा प्रयोग वाचकांच्या डोळ्यांत भरणारा व कांहींना खुपणारा झाला व एकप्रकारची प्रयोगशीलता व अपरिपक्वता सर्वांना जाणवली—लेखकालाहि ती जाणवली.

या जाणिवेंतून पुढे जाऊन प्रस्तुत कादंबरीच्या रचनेची पूर्वतयारी लेखकाने केली व सातआठ वर्षांच्या चिंतनानंतर तिचा सुश्लिष्ट व्यूह निर्माण केला. यांत या कादंबरीच्या यशाची ग्वाही आहे. पूर्वीच्या कथनपद्धतीचा व भाषेच्या ढंगाचा धागा न दिसतांहि या कादंबरींत एक वेगळेपणा आहे. आशय जास्त मोठा व गुंतागुंतीचा आहे व मांडणीमध्ये जास्त संथपणा आहे. यामुळे एकंदरच सघनता कथानकाला व कथनाला आली आहे.

पोरका —[ कादंबरी : लेखक : प्रा. वसन्त कानेटकर; प्रकाशक : गणेश रामराव भटकळ, पॉप्युलर बुक—डेपो, लॅमिंग्टन रोड, मुंबई ७. पृष्ठें २२२, मूल्य ४ रु. ]

‘ दोन पोरक्या व्यक्ति ’

या कादंबरीमध्ये सुमित्रा व छन्या या दोन पोरक्या व्यक्तींचें एकमेकांत गुंतलेलें व गुंतून पोरकेपणांतून मुक्त झालेलें जीवन वर्णन केलें आहे. सुमित्रा ही पोरकी मुलगी दादासाहेबांनी वाढविलेली असते व वयाच्या पंधराव्या वर्षी एका सतारियाच्या कामवासनेला बळी पडते. ‘ फुलराणी ’ म्हणून जिचें दादासाहेबांनी कोडकौतुक केलें व जिच्या हृदयांत रूपरसगंध आणि स्वर यांचें अनिवार वेड जागें झालें ती सुमित्रा या अकल्पित आघाताने एकदम ‘पोरकी’ झाली. ‘सृष्टींतलें सगळें माधुर्य फसवें आहे ’ असें तिच्या मनाने घेतलें आणि ती रूक्ष, मुकें व अपराध्यासारखें जीवन जगूं लागली. तिची कानीन मुलगी एका वेश्येला देऊन टाकण्यांत आली व या घटनेमुळे तिच्या मनांत पराकाष्ठेच्या अपराधीपणाची जाणीव खोल घर करून बसली. शिकून अध्यापिकेचा पेशा तिने पत्करिला व कर्तव्यतत्परतेमध्ये स्वतःला बुडवून टाकलें.

या साऱ्या घटनेंत एका निष्पाप व अजाण मुलीच्या दुर्दैवाची करुणकहाणीच फक्त लेखकाला सांगावयाची असती तर तो विषय नुसताच भावनोत्कट पण हजारो वेळां मांडला गेलेला व बेचव झाला असता. तसें कानेटकरांना करावयाचें नसून ही घटना त्यांनी केवळ प्रारंभाला घेतली आहे व सुमित्रेच्या मनाचा पुढील विकास दाखविण्यासाठी कादंबरीचा विस्तार केला आहे. जगांतल्या सर्व चांगुलपणाला व सौंदर्याला मुकलेली सुमित्रा मोठी तपस्विनीसारखी कर्तव्यनिष्ठ झाली व या सेवाव्रतांत तिला मनःशांति लाभली असें त्यांना दाखववायाचें नाही. या तऱ्हेचो सोडवणूक शिष्ट समाजाने करून ठेवलेली आहेच. मठ-संस्थेच्या आश्रयाला जाऊन संन्यासव्रत घेण्याचा मार्ग युरोपीय समाजाने अशा दुर्दैवी मुलींसाठी आखून दिला होता. आपल्याकडे ती व्यवस्था नव्हती; पण अलीकडच्या काळांत विधवांना ( किंवा कुमारी मातांनाहि ) सेवाव्रताचा मार्ग उपलब्ध झालेला आहे. पण, ह्या मार्गात शिष्टसंमत सोय असूनहि त्या मुलीच्या मानसिक विकासाचा यक्षप्रश्न शिल्लकच उरतो.

कानेटकरांनी या प्रश्नावर बोट ठेवलें आहे. “सुमित्रेचा प्रसन्नपणा आणि तिची शांतता उपरी होती ” असें सांगून त्यांनी तिच्या मनांतील अपूर्णतेची व्यथा प्रथमच स्पष्ट केली आहे. पुन्हा छन्याच्या नाट्यवेडामुळे व्याकूळ झालेली सुमित्रा याच दाहक अपुरेपणांत जळत असतांना लेखक म्हणतो, “ सक्तीने कशाचीहि सवय होते, आणि सवय झाल्यावर कांहीहि आवडूं लागतें असा तिचा अनुभव होता. आपल्या परीने तिने जीवनाचा हाच अर्थ लावला होता. गेलीं पंधरा वर्षे मनाचे गरुडपंख छाटीत छाटीत मनाला भुंडे करीत याच कडू अनुभवाच्या नि रूक्ष अर्थाच्या रुळावरून तिने आपलें स्वतःचें जीवन दामटलें नव्हतें का ? जें तिला साध्य झालें तें छन्याला कां साध्य होऊं नये ?” (पा. १५० ); पण कादंबरीच्या कथानकाची निरगाठ मारीतच त्यांनी हा प्रश्न सुमित्रेच्या मनांत उभा केला आहे. या प्रश्नाचें उत्तर देण्यांतच कादंबरीची पुढची उकल आहे. तें उत्तर असें आहे की, मनाचे पंख छाटतां येत नाहीत व दुर्दैवाच्या वणव्यांतहि ते जळून खाक होत नाहीत. छन्यासारख्या मुलावर वात्सल्याची पाखर घालूनहि सुमित्रेसारख्या स्त्रीचें व्यक्तित्व परिपूर्ण होऊं शकत नाही. नुसतें वात्सल्य नव्हे तर त्यांतून अधिक मोठी व परिपक्व जाणीव उदयास यावी लागते. प्रौढत्वाच्या व आत्मविकासाच्या प्रसन्न जाणिवेंत प्रेमाची परिणति व्हावी लागते.

सुमित्रेचें ‘ पोरकेंपण ’ व अपुरेपणाने धगधगणारें हृदय शेवटीं या प्रौढ जाणिवेंत शांत होतें हें या कादंबरींत लेखकाने दाखविलें आहे—निदान तसें दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. या तिच्या आत्मविकासाला किशोरावस्थेंतून प्रौढत्वांत झालेलें रूपांतर व पूर्णता म्हणतां

अनुक्रमणिका

येईल. या परिणतीला साधनभूत होणारा छब्या हाहि एक पोरका मुलगा आहे व यामुळे सुमित्रा व छब्या यांचें सहजीवन हें एकंदर कथानकाच्या मूळ समस्येला अनुवृत्तीने घनता आणणारें झालें आहे. सुमित्रेच्या जीवनाचा व्यूहच छब्याच्या जीवनांतहि पडसादासारखा पुनरावृत्त झाला आहे—फरक आहे तो केवळ त्या दोघांच्या वयांत आहे, तसाच एक किशोर व एक कुमारिका यांच्यावर होणाऱ्या आघातांच्या भिन्नतेंत आहे.

छब्याची जीवनरेखा त्याच्या वयाच्या बाराव्या वर्षांपासून लेखकाने रेखाटली आहे. या वयांत तो सुमित्रेच्या आसऱ्याला येतो व तेंहि तिची वंचना करूनच. पण ही वंचना पुढे त्याला असह्य होते व तो तिच्यापाशी सर्व पूर्वचरित्र सांगून निरोप मागतो. एवढ्याशा पोराचें आत्मवृत्त तें काय असणार ? पण तें दुर्दैवाने मोठें भेसूर असतें. बऱ्याच तपशिलांत लेखकाने तें रंगविलें आहे व आपल्या स्वतःच्या परिघांतहि तें क्षोभकारक वठलें आहे. परंतु यानंतरहि सुमित्रेचा आसरा छब्याला सोडावा लागत नाही. उलट "आईनेसुद्धा कधी एवढी माया माझ्यावर केली नाही; मी तर तुमचा कोणीच नव्हे !" असें म्हणणाऱ्या छब्याला तिच्याकडून गाढ प्रेमाचा लाभ होतो.

या प्रेमाचा उगम स्त्रीसुलभ वात्सल्यांत असतो पण फक्त उगमच. खरें म्हणजे त्या दोघांतलें नातें रक्ताच्या नात्यापेक्षा जवळचें जडतें व याला एक खोल व्यथेची व मनांच्या धडपडीची एकरूपता कारण होते. त्यांच्या वयांत सुमारें सोळा वर्षांचें अंतर असतें व त्यांची गाठ पडते तेव्हा छब्याचें बालवयच असतें. परतु पांचसहा वर्षांनतर छब्या किशोरावस्थेंत येतो व त्याचें मन कोषांत बद्ध असतांना रूपांतराची जाग आलेल्या सुरवंटासारखें बेभान व बेताल होऊं लागतें. त्याला आपल्या ममतेच्या कोषांत ठेवूं पाहणारी सुमित्रा वयाने तेहतीस वर्षांची असली तरी मनानें किशोरावस्थेंतच असते. तिला छब्याच्या जीवनाला आकार देण्याची धडपड करतांना ममतेबरोबर स्वतःच्या विकासाचा व मुक्तीचा मार्ग सापडूं लागतो. दुर्दैवाने बधिर व आंधळ्यासारख्या झालेल्या तिच्या मनश्चक्षूंना प्रथमप्रथम हा मार्ग दिसत नाही व भीतीमुळे निर्माण झालेलीं तिच्याच मनांतलीं भुतें तिचा मार्ग रोधून टाकतात. छब्याच्या मनाला वळण देण्याचा प्रयत्न करीत असतांना तिला कलासक्तीचें भूत व वंचनेचें भूत भेडसावूं लागतें आणि उलट कलानिर्मितीची मृत आशाहि पिशाचरूपानें मुक्ति मागूं लागते. ती स्वतःला विचारते, "आपण छब्याच्या मनाचा कायापालट करीत आहोंत की त्याचें निमित्त करून आपल्या स्वतःच्या मनाचा कायापालट करीत आहोंत ? " हा 'विचित्र प्रश्न' तिच्या मनांत सारखा उभा होता असें म्हणतांना लेखकाने सुमित्रा व छब्या यांच्या सहजीवनाची खरीखुरी गुंतागुंत सूचित केली आहे. त्या दोन जीवांची परस्परांवरील माया उदात्त, गाढ व अकृत्रिम तर होतीच, पण या मायेमध्ये व परस्परावलंबनामध्ये दोघांच्याहि मनाच्या उन्नयनाची शक्ति जागी होत होती.

## इतर व्यक्तिरेखा

कादंबरींतील मुख्य पात्रांची व समस्येची ओळख करून देतांना मी कथानकाची ओळख करून देण्याचें टाळलें आहे. कारण येथे तें वाचकांना अपरिचित राहणेंच योग्य होईल. या कादंबरींतील इतर पात्रांची ओळख करून देणेंहि जरूर नाही; पण येथे एक गोष्ट जाणवते ती सांगणें जरूर वाटतें. सुमित्रेचा सांभाळ करणारे दादासाहेब व माई, छब्याचे बाबा व आई, रघुवीर मास्तर, गुंडांच्या टोळीचा नायक धर्माप्पा, सुमित्रेचा नवरा भाई दिनानाथ, तिला भ्रष्ट करणारा पंडित इंद्रभूषण व शेवटीं तिला परत कलेचें मुक्तिदायक वरदान देणारे

खांसाहेब अशा व्यक्तींचा प्रपंच लेखकाने सुमित्रा व छब्या यांच्याभोवतीं उभा केला आहे. या व्यक्तींचीं चित्रें जिवंतपणें समोर उभीं राहावींत इतक्या कौशल्यानें रेखाटण्यांत आलीं आहेत. कांही वेळां या चित्रणाचे रंग पोस्टरच्या रंगांसारखे भडक आहेत व एकंदर जो टसटशीत-पणा आहे तो सोप्या ढोबळपणाने साधला आहे. 'पंख' या कादंबरींत पांडू मास्तरा-भोवतालच्या पात्रांची हीच गत आहे व तींच सुष्ट-दुष्ट पात्रें थोडेंफार वेषांतर करून सुमित्रा-छब्याच्याभोवती उभीं आहेत. रावसाहेबच दिवाणसाहेब झाले आहेत, मामांची जागा दादांनी घेतली आहे व अण्णासाहेबांना असलेली खरी प्रगल्भ कलादृष्टि खांसाहेबाच्या रम्य उदात्त शब्दांतून प्रत्ययास येत आहे. यांत कांही तसें गौण नाही, पण एक गोष्ट जाणवूं लागते की, जुन्या व नव्या कादंबरींतील हीं सर्व पात्रें एका तटस्थपणाने व नेटक्या कौशल्याने वर्णन केलेलीं आहेत.

दुसऱ्या शब्दांत हीच गोष्ट सांगावयाची तर कानेटकरांना आपल्या गानवेड्या किंवा नाट्य-वेड्या कलंदर पात्रांशीं व त्यांच्या दुर्दैवाशीं एकरूप होतां येते तसें इतर पात्रांशीं होतां येत नाही. सूक्ष्म व नाट्यलक्षी निरीक्षणाने टिपून घेतलेलीं प्रसंगचित्रें व व्यक्तिरेखा त्यांनी रेखाटल्या आहेत पण त्यांचें मन त्यांत गुतलेलें व ओतलेलें नाही. कादंबरीमध्ये त्यामुळे असें झालें आहे की, कोठे सहानुभूतीची खोली व अंतःसाल गाठण्याची धडपड आहे, तर कोठे नाट्य, भाषेचा अलंकार, चित्रण यांवर भर आहे. हरिभाऊंच्या कादंबऱ्यांतून इतर शैथिल्य असलें तरी सर्वदूर सहानुभूतीचें समतल साधलेलें आढळतें. सुष्ट-दुष्ट, गौण-प्रधान पात्रांच्या बाबतींत कादंबरीकाराने कलात्मक सहानुभूतीचें असें समतल राखणें ही त्याच्या व्यूहाच्या सुश्लिष्टतेच्या व समतोलपणाच्या दृष्टीने आवश्यक गोष्ट आहे. नाहीतर इतर पात्रांचें कार्य केवळ साधनांचें राहते व साहजिकच त्यांना साचेबंदपणा व निर्जीवपणा येतो.

## भाषा व संकेत

कानेटकरांची भाषा नाट्यमय आहे व सूक्ष्म वर्णनांनी नटलेली आहे. 'मोवा', 'हादणें', 'खमादून बसणें', 'मुखावरील भावबदल', 'मनाचा तिरळेपणा' असे कांही अपरिचित व कांही वेगळेच शब्द ते वापरतात व मुद्दाम वापरतात. तसेंच कांही वाक्यें काव्यमय केल्या-सारखीं लिहतात. उदा. "एका गल्लीच्या तोंडाशी एक काळवंडलेली कळकट म्हातारी चाळ गर्दी चिवडीत बसली होती" आणि एके ठिकाणीं "ती घण् घण् वाजणारी घंटा वाहात वाहात त्याच्या मनांत दूर दूर कोठेंतरी झिरपूं लागली." या वाक्यांच्या रचनेवर नवकविता व नवकथा यांतील लकबींची छाया पडलेली दिसते. हीं वाक्यें म्हणूनच कानेटकरांच्या एकंदर भाषाभिव्यक्तीच्या प्रवाहांत चपखल बसणारीं नाहीत. त्यांची स्वतःची अशी एक निवेदनपद्धति बनत चाललेली आहे व तिच्या घडणींत असे चमत्कृतिपूर्ण शब्द आणि वाक्यें हीं उपकारक ठरणारीं नाहीत असें मला वाटतें.

ज्या जिव्हाळ्याने सघन आशयाचें अनुसंधान राखून कानेटकर लिहीत जातात त्याच्या पूर्ण अभिव्यक्तीसाठी भाषा जितकी ऋजु व अनलंकृत असेल तितकी ती आशयाशीं एकरूप होईल. या दृष्टीने त्यांच्या कथनांतील भासचित्रें, स्वप्नें, दिवास्वप्नें व संकेत आणि उपमा यांचाहि थोडा विचार करावा लागेल. या कादंबरीमध्ये दिवास्वप्नांनी छब्या व सुमित्रा यांच्या मनोव्यापारांची उकल दाखविण्याचा मार्ग लेखकाने अनेकदा स्वीकारला आहे. बहुतेक वेळीं हीं दिवास्वप्नें खरोखरच अंतरंगाचा ठाव घेतात, पण कांही वेळां तीं नुसतीं रंगीबेरंगी फुग्यासारखीं वाटतात. जेथें व्यक्त मनाचे व्यापार वर्णन करायला शब्द अपुरे पडतात किंवा

साध्या वर्णनाला न झेपणारा ताण पडूं लागतो तेव्हां सूचक संयमाने तें कार्य साधल्यास जास्त परिणामकारक ठरतें. खांसाहेब व सुमित्रा यांच्या संवादामध्ये अशी संयमित सूचकता गुलाबाच्या फुलाचें रूपक घालूनहि लेखकाला साधली आहे.

या सूचकतेऐवजी रूपककथांतील पद्धतीचा अवलंब करण्याचा मोह लेखकाला अनेक ठिकाणीं झालेला दिसतो. सर्व कथानकांत 'घतार' हें एक जणू काय पालच वावरत आहे असा भास त्यांनीं निर्माण केला आहे व यांत ही रूपकाची ओढ दिसून येते. फुलांची, पावसाच्या व वादळाच्या तांडवाचीं, पाकोळ्यांच्या थव्यांचीं अशीं रूपकें त्यांनी बरेच वेळां वापरलीं आहेत. या सर्वांची त्या क्षणीं समर्पकता पटली तरी एकंदर भाषेची ऋजुता जाऊन तिला अलंकाराने येणारा बोजडपणा येतो असें मला वाटतें. सूक्ष्मांत सूक्ष्म मनोविश्लेषण हें जास्तींत जास्त अनलंकृत भाषेंत साध्य होऊं शकतें हें जर खरें असेल, तर मला वाटतें कानेटकरांच्या आशयाशीं आहे त्यापेक्षा पुष्कळ साधी भाषा सुसंवादी व अर्थवाही होऊं शकेल.

## समारोप

या कादंबरींतील मुख्य समस्या एक मुलगा व एक तरुण स्त्री यांच्या मनोविकासाची आहे. दोन व्यक्तींचीं दोन मनें एका व्यथेने व एकाच दुर्दम्य 'हिरव्या शक्तीने' एकत्र गुंफलीं जातात. परस्परांच्या आसऱ्याने किशोरावस्थेंतून स्वतःचो मुक्तता करून घेतात. कलासक्तीच्या व ध्येयवादित्वाच्या फसव्या रूपांना कवटाळून होरपळून निघाल्यावर कलेच्या व उदात्त स्वार्थ-निरपेक्ष प्रेमाच्या खऱ्या आनंदानें न्हाऊन निघतात.

कादंबरींत या दोन मनांचें विश्लेषण आहे व तें एका दिशेने व एका सूत्राने विकास पावणाऱ्या मनांचें चित्रण आहे. नुसतीं मनें व त्यांचे मनोव्यापार या ठिकाणीं कलेचा आशय नसून व्यक्तित्वाची सघन व सुघड रचना कशी होत जाते याचा कलावंताने मागोवा घेतला आहे. मला वाटतें की, आजच्या नवकथेंत किंवा नवीन कादंबरींत अशा मनोविश्लेषणाकडे अनेक कलावंत वळले आहेत आणि व्यक्तित्वाच्या घडणीलाच आज प्राधान्य देण्यांत येत आहे. साहजिकच अबोध मनोव्यापारांच्या घरंगळत्या 'संज्ञाप्रवाहा' ला किंवा 'भिनेवेहऱ्याच्या' सुप्त इच्छांना आशय मानून एक वेगळीच तरंगती भावसृष्टि निर्माण करणें म्हणजे खरी कला-निर्मिति होय हा आग्रह आता मागे पडत आहे. तो आग्रह हा केवळ एक प्रतिक्रिया होतो. सामाजिक वस्तुस्थितीचें नुसतें निवेदन करण्यासच कलानिर्मिति म्हणावें या 'वास्तववादा' च्या आग्रहाला किंवा बोधवादाच्या आग्रहाला विरोध करण्याच्या भरांत ती प्रतिक्रिया झाली व तिला ऐकांतिक स्वरूप आलें. आता तशा प्रतिक्रियेची गरज संपली असून व्यक्तित्वाच्या आशयाकडे व भाषेच्या सुबोध ऋजुतेकडे आपण आता वळलों आहोंत. या दृष्टीने 'घर', 'पंख' व 'पोरका' या तीन कलाकृतींमध्येच दिसून येणारा विकासक्रम सूचक आहे. कानेटकरांच्या कादंबऱ्यांतून प्रत्ययास येणारी सहृदयता व कलात्मक सुश्लिष्ट रचनेला लागणारी दृष्टि व भाषेचें सामर्थ्य पाहतां, प्रस्तुत कादंबरीपेक्षाहि जास्त मोठ्या आशयाची व व्यूहाची कलाकृति ते निर्माण करूं शकतील अशी सहजच अपेक्षा निर्माण होते. आज अशा कलाकृतींची मराठींत फार अल्प प्रमाणांत भर पडत आहे; म्हणून प्रस्तुत कलाकृतीबद्दल लेखकाचें (व प्रकाशकाचें) अभिनंदन करून यापुढील त्यांच्या कृतींची आपण अपेक्षा करूं या ! ● ● ●

दि. के. वेडेकर

## गाथासप्तशती

वाल्मीकि-रामायणाच्या प्रारंभीं 'रामकथा' सांगण्याचें प्रयोजन व्यक्त झालें आहे. "तपःस्वाध्यायनिरत" अशा नारदाला वाल्मीकीने विचारलें; "धर्मज्ञ, गुणवान् चारित्रेण युक्त" असा सध्या जगांत कोण आहे?

या प्रश्नांतील हेतु स्पष्ट होतोः सर्वत्र अनाचाराचें राज्य माजल्यावर वाल्मीकीसारख्याला गुणी, धर्मज्ञ व चारित्र्यवान् अशा पुरुषाची माहिती विचारवीशी वाटली असावी. नारदानेहि त्या व आणखी सद्गुणांचा उच्चार करून 'रामकथा' सांगितली.

रामायणासारख्या आद्यकाव्याचें प्रयोजन समजण्यास तत्कालीन समाजस्थितीची कल्पना करतां येते. वाल्मीकीला सद्गुणी धर्मज्ञाबद्दल उत्कंठा कां वाटत असावी हें समजतें. त्याचप्रमाणे प्रस्तुत ग्रंथाबद्दलचें कुतूहल मात्र वाटतें. त्यासंबंधीं समाधान होत नाही.

हालसातवाहन-संपादित 'गाथासप्तशती'चें प्रयोजन काय? ती कशासाठी रचिली? लिहिली? एक कोटि गाथांतून या सातशें निवडक गाथांचा संग्रह कशासाठी केला? 'काव्यं यशसे अर्थकृते' हे उद्देश ठराविक आहेत. परंतु त्याव्यतिरिक्त कांही व्यापक प्रयोजन ह्या ग्रंथाचें असलें पाहिजे. गाथासप्तशतींतील अनेक गाथा, अलंकारांचीं उत्कृष्ट उदाहरणें म्हणून साहित्य-शास्त्रकारांनी उद्धृत केल्या, हा त्यांचा दुय्यम उपयोग म्हणावा, का तसा उपयोग व्हावा यासाठीच त्यांचें संपादन व संकलन हालाने केलें?

"प्राकृत गाथा मनोरंजक आहेत; त्या मदनागार दूती आहेत; कामकौशल्याच्या शिक्षिका आहेत...." (पृ. ३) हेंच त्यांचें वैशिष्ट्य कळतें. परंतु ७०० गाथा एकाच 'विषया'ला वाहिलेल्या अशा या ग्रंथांत एकत्र आढळत असल्याने प्रयोजनाचा यथार्थ बोध होत नाही. तत्कालीन समाजाचें वास्तविक चित्र त्यांत प्रतिबिंबित असेल तर रामायण-कथा सांगण्याबद्दलचा आग्रह नीट समजतो. असा अनाचार बोकाळल्यावर प्रभु रामचंद्रासारख्या पूर्णावतारी पुरुषांचें चरित्र ऐकावें, अशी इच्छा बळावली तर नवल नाही. किंबहुना राम-चरित्राला—चारित्र्याला—उठाव येण्यासाठी अशा पार्श्वभूमीची आवश्यकता असावी. हालाचा काल, रामायण-काव्य स्थिरावण्याचा काळ यांत त्या दृष्टीने विसंगत असें कांही नाही. बौद्ध धर्मांत तांत्रिकांचें प्रस्थ माजून शेवटीं त्यांत अनाचार प्रभावी ठरला, असें आपण ऐकतों. जैनांच्याहि कथांत तें वर्णन आढळतें. त्यांतून समाजाची सुटका व्हावी म्हणून 'रामकथे'चा तोडगा कुणी दूरदृष्टीच्या महात्म्याने सुचविला असावा.

अशा तर्कवितर्कांचा मतितार्थ हा की, गाथासप्तशतींत अवनत समाजाचें चित्रण आलें आहे. प्रगत प्रवृत्तींच्या लोकांचें वर्णन तींत नाही. तरीहि दीड-दोन हजार वर्षांपूर्वीचें 'जानपद काव्य' म्हणून, गाथासप्तशतीचें महत्त्व कमी नव्हे. पारमार्थिक विचार व्यक्त झाले आहेत अशींच बहुतेक उपलब्ध काव्यें असतां-उच्चभ्रू नागरिकांच्या मनोरंजनार्थ काव्य-नाटक-शास्त्र यांचा प्रसार असतां, हीं अस्सल ग्राम-गीतें ('ग्राम्य'ही म्हणण्यास प्रत्यवाय नाही) 'देवा-धर्मा'चा विचारहि त्यांत नसतां इतक्या दीर्घ कालपर्यंत टिकून राहिलीं. शास्त्री-पंडितांनी अलंकारांचें उदाहरण म्हणून का होईना पण त्यांचा 'दाखला' दिला, हें देखील कांही कमी भाग्य नव्हे.

---

हालसातवाहनाची गाथासप्तशती—[संपादक : सदाशिव आत्माराम जोगळेकर; प्रकाशक : प्रसाद प्रकाशन, पुणें २. किं. रु. २५. पृ. ४४६+६८२+१३].

तरीही गाथासप्तशतीचें यथार्थ प्रयोजन कळत नाही. तें आग्लोककाव्य आहे, प्राकृत जनांचें आहे, असा वारंवार पुकारा केल्याने त्यांतील एकच एक 'अशिष्ट' विषयचर्चा समर्थनीय ठरत नाही. इतक्या अवनतावस्थेस पोचलेली समाजस्थिति अव्वल इंग्रजींत आमच्या-कडे होती. 'लोकहितवादीं'च्या शतपत्रांत त्यांचा पुरेसा उल्लेख आढळतो. पण त्याहि काळांत शृंगारिक लोकवाङ्मयाचीच केवळ पैदास झाली नाही. वेदान्ती, पारमार्थिक 'लावण्या' 'दर्यामें खसखस' या प्रमाणांत का होईना होत्या. तसें गाथासप्तशतींत मुळीच आढळत नाही. संपादक श्री. जोगळेकर यांच्या प्रदीर्घ प्रस्तावनेंत एतत्संबंधी विवेचन अपेक्षित होतें. परंतु त्यांनी त्याबद्दल मौन पत्करलेलें दिसतें. असो.

गाथासप्तशतींत तसें पाहिलें तर सातशें गाथा असावयाच्या. परंतु एकंदर १००६ या ग्रंथांत संपादकांनी मिळविलेल्या आहेत. प्रत्येक गाथेला इंग्रजी व मराठी 'मथळा' आणि अनुक्रम दिला आहे. मूळ प्राकृत गाथा, तिचें संस्कृत स्वरूप, नंतर तिचा अर्थ आणि अखेरीस जरूर तेथें 'भाष्य' अशी एकंदर अवस्था गाथा-खंडाची आहे. (१) गाथांची अकारविल्हे (आद्याक्षरानुसार); (२) अलंकारांचे उल्लेख कोणकोणत्या ग्रंथांत आहेत ते व कोणकोणत्या अलंकारांचीं उदाहरणें गाथासप्तशतींत आढळलीं, यांची सूची; (३) कवि व कवयित्रींच्या नांवांची विगतवारी पीतांबर व भुवनपाल यांच्या मतानुसार; (४) मथळ्यांची अकारविल्हे (मराठी व इंग्रजी); (५) शब्दकोश–इतकी माहिती परिशिष्टांत दिली आहे. ही झाली संपादकीय 'यांत्रिक' कामगिरी. वैचारिक कामगिरीचा खंड गाथासप्तशतीच्या सुरुवातीस दिला आहे. त्याचें नांव 'प्रस्तावना–खंड'. त्याचा विस्तार आहे ४४० पृष्ठांचा. गाथांसाठी लागली सुमारें ६०० पृष्ठें आणि त्यांसंबंधी प्रास्तविकाने व्यापिलीं ४४० पृष्ठें. गाथांच्या प्राकृत स्वरूपाचें (= २००० ओळींचें) शुद्धिपत्र आहे ६ पृष्ठांचें. एवढें सांगितलें की त्या ग्रंथाची बाह्यात्कारीं ओळख पुरी होते.

अंतरंगाविषयी पुष्कळ लिहितां येईल. प्रस्तावनेंत आलेल्या विवेचनाची पारख करावयाची; तें प्रस्तुत–अप्रस्तुत ठरवावयाचें; त्यांत न्यूनाधिक्य काय आहे तें सांगावयाचें आणि एकंदर मत व्यक्त करावयाचें. प्रत्यक्ष गाथांच्या शुद्ध स्वरूपाबद्दल फार थोडें लिहावें लागेल. त्यांचा अर्थ लावण्याबाबत मतभेद होईल आणि भाष्याबाबतहि.

प्रथम प्रास्ताविक चर्चा तपासावयाची. राजवाडे यांच्या प्रदीर्घ प्रस्तावनांसारखी श्री. जोगळेकरांची प्रस्तावना नाही. गाथासप्तशतीच्या ह्या प्रस्तावनेचें स्वरूप थोडेसें ज्ञानकोशासारखें आहे. जे जे उल्लेख गाथांत आले, त्यांसंबंधी 'इत्थंभूत' (अर्थात् संपादकांच्या दृष्टीनें) माहिती देण्याची श्री. जोगळेकरांनी पराकाष्ठा केली आहे. अनेक ग्रंथ धुंडाळून त्यांनी ही माहिती मिळविली, ही त्यांची संपादकीय कामगिरी महत्त्वाची होय. कारण गाथासप्तशतीचा काल सुमारें १५०० ते १८०० वर्षांपूर्वीचा मानतात. गाथासप्तशतींत आढळतें तें वर्णन बहुशः 'गोदा' तटावरील प्रदेशाचें, महाराष्ट्रांतलें असावें, म्हणून गाथासप्तशतीसंबंधी आम्हां महाराष्ट्रियांना विशेष आत्मीयता वाटली पाहिजे, असें संपादकांचें म्हणणें आहे. वर्ण्य परिस्थिति महाराष्ट्रांतील, ग्रामीण जीवनाची आहे असें मानलें तरी ती अभिमानास्पद खास नव्हे. कारण कुठल्याहि समाजांत 'शिष्ट' अशा कांहीं गोष्टी असतात. त्या तशा न मानण्याची वृत्ति क्षणिक कौतुकाची ठरली तरी विचारान्ती समाजाला अहितकर असल्याने

जगीं निंद्य तें सर्व सोडोनि यावें

हाच व्यवहार प्रभावी ठरतो. असो.

अनुक्रमणिका

महाराष्ट्रांतील ह्या आद्यलोककाव्यांतील उल्लेखांवरून पुष्कळ माहिती तत्कालीन समाजासंबंधी समजते आणि तिची व्यवस्थित मांडणी निरनिराळ्या विषयांनुसार संपादकांनी केली आहे. आता इतक्या तपशीलवार माहितीची आवश्यकता या प्रस्तावनेंत होती की काय एवढा मात्र वादग्रस्त प्रश्न आहे. मात्र माहिती सांगतांना किंवा ती मिळवितांना इंग्रजी साधनग्रंथांवरच बहुतेक भिस्त ठेवलेली दिसते.

हत्तीसंबंधी उल्लेख आला तेव्हा हत्तींची पुष्कळ माहिती दोन वेळां दिली आहे खरी; परंतु आमच्याकडे आयुर्वेदाइतकें जुनें ' गजायुर्वेदशास्त्र ' आहे हें संपादकांच्या लक्षांत आलेलें दिसत नाही. तें असतें तर

भद्रो–मंद्रो–मृगो-मिश्रा गजो जात्या चतुर्विधः।

ही माहिती त्यांनी अवश्य दिली असती. हत्तीप्रमाणेच घोड्यांचीहि परीक्षा-चिकित्सा-पद्धति आमच्या संस्कृत पंडितांना अवगत होती. परंतु श्री. जोगळेकरांनी आधीच सांगून ठेवलें आहे की त्यांचें संस्कृतकडे विशेष लक्ष नव्हतें. इंग्रजी ग्रंथ जितक्या सुलभतेने मिळतात व चाळतां येतात तसें संस्कृत ग्रंथांचें मुळीच नाही. तेव्हा बहुतेकांचा ओढा इंग्रजीकडे असल्यास आश्चर्य नव्हे.

प्रदीर्घ प्रस्तावनेंत अनेकविध विषयांचा ऊहापोह आला असला तरी त्यांपैकी एक-दोनांची चर्चा करतां येईल. गाथासप्तशतींत रामाचा किंवा रामकथेचा ओझरता उल्लेख आढळतो ( गाथा ३५ ). येथेसुद्धा देवराला लक्ष्मणाप्रमाणे वागण्याची सूचना भ्रातृजाया देत आहे. इतक्या गाथांत रामकथेचा एवढा अल्पसा अंश यावा, हेंहि एका अर्थी रास्त दिसतें. राम-कथेची आवश्यकता भासावी अशी परिस्थिति असतां, गाथांची रचना झाली असावी.

परंतु श्री. जोगळेकरांनी थोडी निराळी भूमिका घेतली आहे. " व्यभिचारी राधा-कृष्णांच्या विकृत भक्तिपंथाला आव्हान " ( पृ. १८६ ) म्हणून रामकथा प्रसृत झाली असा त्यांचा तर्क कालविपर्यासाचा ठरतो. कारण आज रूढ असलेली रामकथा ही ' बुद्धोत्तर ' असली तरी ती राधा-विलासाइतकी उशिराची खास नाही. कारण श्री. जोगळेकरांनीच दाखविलें आहे की ' राधे 'चा प्रथम उल्लेख नवव्या शतकांत सापडतो ( पृ. १६२ ). राम-कथा राधा-कृष्ण-कथांपेक्षा प्राचीन आहे याबद्दल वास्तविक वाद होऊं नये. शिवाय ' दहि-दुध-माखन-बेचन ' हा धंदा आर्यक्षत्रिय राजांनी प्रतिष्ठित मानला, ह्या घटनेची कांही तरी उपपत्ति लावणें जरूर होतें. ' यदु 'नाथ श्रीकृष्णावर ' माखनचोरी 'चा आरोप आला, गाई वळण्याचें नित्यकाम त्यानें पत्करलें, यावरून असें दिसतें की, गो-पाल ' आभीर ' बाहेर देशांतून आल्यानंतर येथील जनतेंत प्रतिष्ठितपणें मिसळण्याचा, मिरविण्याचा हा एक प्रयत्न असावा. आपलें परदेशीय मूळ लपविण्याचा ( लोपविण्याचा ) आणि एतद्देशीयांत संभावित होण्याचा, हा मार्ग नसेल कसा ? अन्नाचा, खाद्य-पेयांचा व्यापार ' अतिथिदेवो भव ' मानणाऱ्या समाजांत रूढ होणें कठीण वाटतें, म्हणून ही नवी पद्धत कायम व्हावी यासाठी कृष्ण भगवानाला गवळ्याघरीं बालपण काढावें लागलें असावें. हा प्रकार श्री. जोगळेकरांच्या सूक्ष्म निरीक्षणांतून, त्यांच्या चौफेर दृष्टिपथांतून कसा निसटला याचें आश्चर्य वाटतें आणि कृष्णजीवनांत ' राधा ' इतक्या उशिरा आली असेल तर तिजसंबंधीचे उल्लेख ज्या गाथांत आहेत, त्यांचें काय ? असो. हा काल-विपर्यास फार गुंतागुंतीचा असल्याने त्याबाबत नुसती अनुमानेंच काढणें इष्ट.

गाथासप्तशतींत अश्वाचा उल्लेख नाही; मत्स्यांचा आहे; पण मत्स्याहाराचा नाही, हें श्री. जोगळेकरांनी बरोबर हेरलें. म्हणून वाटतें की भिमथडी तट्टांची पैदास ही महाराष्ट्रांत बऱ्याच

उशिरा झाली असावी. त्याचप्रमाणे मराठे वीरांची आवडती शस्त्रें-भाला-बर्ची, यांचा देखील उल्लेख गाथासप्तशतींत आढळत नाही. शिकाऱ्यांचे धनुष्यबाण आहेत आणि गाथा ५८५ मध्ये 'हातभाला' आला असावा असें वाटतें. तो तितकासा स्पष्ट निर्देश नाही. आंब्याच्या नव्या पालवीला नवभल्ल ही उपमा आहे. तिचा नीट बोध होत नाही. मुख्य मुद्दा हा की, वीररसाचा उल्लेख सबंध गाथासप्तशतींत-१००६ गाथांत-फारसा नाहीच! इथूनतिथून सारा शृंगाराचा कारभार. मल्लांचे दोन उल्लेख आहेत खरे (गाथा ६८४-८५), परंतु मर्दानी खेळ, आट्यापाट्या, हुटिदांडू, कसरत, मल्लखांब इत्यादि जवानी 'पोकां'चा ओझरता तरी संबंध ह्या महाराष्ट्रीय आद्य जानपदकाव्यकोशांत कां नसावा? बायकी फुगड्यांचा उल्लेख आहे हें मात्र खरें (गाथा १९६).

धनुष्यबाणांचा गाथाशप्तशतींतला उल्लेख जरा चिन्त्य आहे—नव्हे श्री. जोगळेकरांची त्यावरील मल्लीनाथी-खोल अभ्यास-वादग्रस्त आहे. भारतीय तिरंदाज धनुष्य उभें धरीत तर युरोपीयांना तें आडवें धरण्याची सवय होती हा फरक मोठा होय. 'ज्या' कशाची असे, कार्मुक, कोदंड, धनु इत्यादि नांवांवरून कोणत्या प्रकारच्या धनुष्यांचा बोध होतो, इत्यादि माहिती नव्याने कळते. परंतु विषारी बाणांचा उपयोग कोठे करायचा हें सांगतांना श्री. जोगळेकरांचें चुकतें आहे असें वाटतें.

"विषारी बाणांचा वापर धर्मयुद्धांत करावयाचा नाही असा सक्त नियम होता. अनार्यांचे जमाव व हिंस्र श्वापदें यांसाठीच त्यांचा उपयोग होत असावा" (पृ. ३०६).

भारतीय आर्यांबद्दल आमच्या महाराष्ट्राभिमानी संपाद कांची विपर्यस्त कल्पना दिसते. "अनार्यांना विषारी बाणांनी" ठार करण्याचा क्रूर विचार आर्यांच्या स्वप्नांतहि आला नसता. कारण अनार्यांचा 'नाश' करणें-त्यांना येनकेण प्रकारेन जगांतून नाहीसें करणें-हें भारतीय आर्यसंस्कृतींत बसणारें तत्त्व नव्हे. अर्वाचीन अमेरिकनांनी 'रक्त' इंडियनांची शिकार करून त्यांना नामशेष करण्यापर्यंत मजल गाठली. ब्रिटिश आणि इतर युरोपियन साम्राज्य-संवर्धनाचा इतिहास तर अशा मानवी शिकारींनी 'रक्त'रंजित असल्याचें स्पष्ट नमूद आहे. आज अल्जीरियांत फ्रेंच अशीच शिकार खेळत आहेत; ब्रिटिशांनी केनियांत तशीच माऊ-माऊंची कत्तल केली-परंतु आर्यरीत अशी खास नव्हती. विषारी बाण अनार्यांसाठी वापरणारी तर मुळीच नसावी.

श्री. जोगळेकरांना हें पटावें म्हणून पुनः रामायणाकडे अंगुलिनिर्देश करणें प्राप्त आहे. प्रारंभीं वाल्मीकीने 'अनार्य' निषादाला 'शाप' दिला, त्यांत देखील

'त्या मेल्याचें समूळ तळपट होवो'

अशी अभद्र वाणी नाही. तर निषादांना चिरंतन जीवनाचें आश्वासन आहे. 'शाश्वती: समाः' त्यांनी (अप्रतिष्ठितपणें) राहावें अशी ती शापवाणी आहे. शिवाय आपल्या दुर्वर्तनाने अवतार घेण्याचा प्रसंग देवावर आणणाऱ्या दानवांनाहि "उत्तमा गति" लाभण्याची व्यवस्था आमच्या आर्य पद्धतींत आहे-विषारी बाणाने वध करण्याची नव्हे. नारसिंह-राम, कृष्ण... यांनी निर्दाळलेल्या 'दुष्टां'ची गति अखेरीस श्रेष्ठच होती. इतका विस्तार या आर्य-अनार्य कल्पनांचा करावा लागला. कारण श्री. जोगळेकरांसारख्या जागरूक विचारवंतांवरहि प्रचलित राजकारणाचा असा जबरा पगडा बसलेला दिसला. अस्तु.

आहाराबद्दलचें विवेचन वैदिक कालापासून केलें असलें तरी त्यांत थोडा समजुतीचा घोटाळा दिसतो. कृष्णयजुर्वेदतैत्तिरीयसंहितांतर्गत रुद्राध्यायांत–

'अन्नं, अक्षु, व्रीहयः, यवाः, माषाः, तिलाः, मुद्गाः, खल्वाः, गोधूमाः, मसुराः, प्रियंगवः, अणवः, श्यामाकाः, नीवाराः' असा धान्यांचा निर्देश येतो. मग नंतरच्या उपनिषत्कालांत (श्री. जोगळेकरांनी 'तैत्तिरीयांत व बृहदारण्यकांत' (पृ. २१३) म्हटलें आहे तें उपनिषदांस अनुलक्षून आहेसें वाटतें) दहा धान्यांचा उल्लेख असल्याचें सांगण्यांत काय स्वारस्य ?

कपाशीबद्दल आणि एकंदर वस्त्रप्रावरणांविषयी श्री. जोगळेकरांनी बरेंच लिहिलें आहे. "युरोपियनांचें सांगण्यासारखें अज्ञान" म्हणून ख्रि. पू. पांचव्या शतकांतल्या हिरोडोटसचा उतारा त्यांनी दिला आहे (पृ. २५०). "जंगली झाडाचीं लोकरीचीं फळें" अशी कापसाची व्याख्या अज्ञजनांनी केली तर तींत हसण्यासारखें काय आहे ? त्या मानाने आमचें अज्ञान अपार ठरेल; म्हणून युरोपियनांना हसायला–हिणवायला–नको होतें. शिवाय "जंगली झाडाचीं लोकरीचीं फळें" हा उल्लेख बहुधा शाल्मली वृक्षाचा असावा. "म्हाताऱ्यां" च्या बोंडांचा व कपाशीच्या बोंडांचा हा घोटाळा झालेला दिसतो. ऐकीव माहितीवर आधारलेलें हें वर्णन फारसें चूक म्हणतां येणार नाही. कापूस हा शब्द ज्यांना ठाऊक नाही, ते लोक कपाशीचें वर्णन असेंच कांहीतरी करतील हें उघड आहे.

वेदकालीन आर्यांच्या पोषाखांत उष्णीषाचा समावेश नसावा. श्री. जोगळेकरांनी त्याला अग्रस्थान दिलें आहे (पृ. २५१). समाजांत वस्त्रें रूढ झालीं तीं 'आपादमस्तक' या क्रमाने नव्हे किंवा तद्विरुद्ध क्रमाने नव्हे. बहुधा मध्य-भागापासून वस्त्रांचा वापर सुरू झाला असावा. उपवस्त्र—हें उपरणें; भटक्या लोकांजवळ आपलीं वस्त्रें अंगाखांद्यावरच राहावयाचीं; पिशव्या, थैल्या, पेट्या इत्यादि प्रकार रूढ नसतांना प्रत्येकाच्या कपड्याचा 'संच' अंगावरच ठेवण्याची–बाळगण्याची–पद्धत निघाली असावी इत्यादि तर्क आणि श्री. जोगळेकरांचें विवेचन यांत फरक आहे.

वेदकाळ, महाभारतकाळ यांचा उल्लेख केल्यावर ते असीरिया, खाल्डिया, इजिप्त इत्यादि देशांतील परिस्थितीचा दाखला देतात. नंतर भारहूत–सांची, अजंठा इत्यादि शिल्पें, चित्रें यांतील वस्त्राभरणांची तपासणी त्यांनी केली आहे. वस्त्राबाबत किंवा दागिन्यां-बाबतहि 'चातुर्वर्ण्य' पद्धत रूढ असलेली श्री. जोगळेकरांच्या लक्षांत आलेली दिसत नाही. विशेषतः सुवर्णाचे, रत्नांचे दागिने हे सर्ववर्णीयांना सारख्याच मोकळ्या रीतीने वापरण्यास मुभा नव्हती. उदाहरणार्थ, सुवर्णालंकार कमरेखाली वापरण्याचा हक्क फक्त राजघराण्यांतील मंडळींना किंवा राजाने अधिकार दिलेल्यांना असे. वैश्यशूद्रांना सुवर्णालंकार जणू निषिद्ध होते; म्हणून चांदी-रुप्याचे अलंकार त्यांत रूढ झाले. वन्य जातींना चांदी-सोनें, हिरे-माणकें मुळीच वापरतां येत नसत. म्हणून रंगी-बेरंगी काचमणि, 'गुंजा'सारखीं वन्य फळें, हीं त्यांच्या भूषणांत येत; इत्यादि माहिती असती तर पुष्कळ वर्णन कमी करतां आलें असतें.

कांचोळी व चोळी हीं वस्त्रें 'शकां'नी भारतांत रूढ केलीं–त्यांच्यापासून आपण घेतलीं असें मत (पृ. २६३) वर आलें आहे. बॅक्ट्रियांत 'चोल' शब्द वस्त्रार्थी आजहि रूढ असल्याचा पुरावा दिला असला तरी 'चोल' राजे दक्षिणेकडे किती तरी वर्षे सत्ता गाजवीत होते. त्यांच्याशीं हा संबंध कां पोचूं नये ? चोलराज्यांत रूढ असलेला हा वस्त्र-विशेष नसेल कशावरून ?

तापी पवित्र कां ? असें एक कोडें जोगळेकरांना पडलेलें दिसतें (पृ. ६१). वास्तविक नदी-तीर हें आमच्या जीवनांत पवित्र आहे. पंजाबांतील नद्या तेवढ्या अपवादात्मक समजाव्या. ( त्याबाबत खुलासा कर्णपर्वांत कर्ण-शल्यांचीं उत्तरें-प्रत्युत्तरें आहेत त्यांत मिळतो) परंतु-

उत्तरवाहिनी गंगा ( हरद्वार )
पश्चिमवाहिनी यमुना ( प्रयाग )
पूर्ववाहिनी पायोष्णी
दक्षिणवाहिनी गोदावरी ( नासिक )

ह्या नद्यांच्या विशेष पावित्र्याबाबतच दंडक लोकविश्रुत आहे. पायोष्णी-तापी-ताप्ती-ह्या अर्थ सहज समजण्यासारखा आहे. इंग्रजींत 'तापी' ला 'ताप्ती'च म्हणतात आणि या उदाहरणांत तरी इंग्रजी नांव संस्कृतच्या जवळचें आहे.

संस्कृत-प्राकृतचा फारसा अभ्यास नसतां, गाथासप्तशतीसारखें प्राचीन काव्य संशोधनासाठी स्वयंस्फूर्तीनें पत्करून, आपले नित्यव्यवसाय आणि 'संकटा ह्याहिताग्नीनां प्रत्यवायैर्गृहस्थता' सांभाळून त्यांनी इतका व्यासंगपूर्ण अभ्यास चालू ठेवला, ह्या सर्वच बाबी कौतुकास्पद आहेत. गाथांपैकी कुठल्या गाथेचा अर्थ बरोबर आहे, कोणता चुकला, पाठभेद कोणता ग्राह्य होता, इत्यादि वाद मुद्दाम काढले नाहीत. त्यांत एकमत कधी होईलच असें सांगवत नाही. ● ● ●

श्री. रा. टिकेकर



# महाराष्ट्र-साहित्य-परिषद्, पुणें २.

## १९५६-५७ चें इतिवृत्त

सभासद संख्या—वर्षअखेर सभासद संख्या एकूण १४७१ आहे. त्यांपैकीं साधारण ९९५, तहहयात ४३०, हितचिंतक ३१, साहाय्यक ९, आश्रयदाते ४ व उपकर्ते २ अशी वर्गवारी आहे. गतवर्षी साधारण, ११०० तहहयात ४२०, हिताचिंतक ३२, साहाय्यक ९, आश्रयदाते ४ व उपकर्ते २ अशी एकूण १५६७ संख्या होती.

आर्थिकस्थिति—सोबत जमाखर्चाचें पत्रक व ताळेबंद-पत्रकें आहेत. त्यांवरून संस्थेच्या आर्थिक स्थितीची सभासदांना कल्पना येईल. १९५७-५८ चा अर्थसंकल्पहि सोबत आहे.

स्मृतिदिन—ज्ञानकोशकार कै. डॉ. श्री. व्यं. केतकर यांच्या स्मृतिदिनीं १०एप्रिलला सकाळीं त्यांच्या समाधीला पुष्पांजलि वाहण्यांत आली. सायंकाळीं प्रा. श्री. के. क्षीरसागर यांचे कै. केतकरांविषयी व्याख्यान झालें. कै. वा. म. जोशी यांच्या स्मृतिदिनप्रसंगीं ( २० जुलै) प्रा. वि. स. गोगटे यांचें व्याख्यान झालें. कै. काकासाहेब खाडिलकर यांच्या स्मृतिदिन प्रसंगीं ( २६ ऑगस्ट ) पं. महादेवशास्त्री जोशी यांचें व्याख्यान झालें. यावेळीं श्री. य. ना. आठवले ( गं. ना. मंडळी ) व श्री. ह. वि. वाडेकर यांनीहि श्रद्धांजलि वाहिली. कै. माधव जूलियन स्मृतिदिन २९ नोव्हेंबरला कवि बा. भ. बोरकर यांच्या अध्यक्षतेने साजरा झाला. याप्रसंगी श्री. बोरकर यांनी 'बोलींचा अभ्यास' या विषयावर व्याख्यान दिलें. दि. २३ जानेवारीला कै. राम गणेश गडकरी यांच्या स्मृतिदिनीं प्रा. मा. का. देशपांडे यांचें 'गडकरी आणि त्यांचें मद्यपान' या विषयावर व्याख्यान झालें.

कै. मर्ढेकर दुखवटा-सभा—सुप्रसिद्ध कवि व समीक्षक कै. बा. सी. मर्ढेकर यांच्या अकालीं निधनानिमित्त रविवार दि. ८ एप्रिलला श्री. वि. शि. भिडे ( आय. सी. एस्. ) यांच्या अध्यक्षतेने दुखवटा सभा झाली. सभेंत श्री. के. नारायण काळे, प्रा. वा. ल. कुलकर्णी, श्री. गोपीनाथ तळवलकर प्रा. रा. भि. जोशी, प्रा. दि. के. बेडेकर, डॉ. वि. म. कुलकर्णी, प्रा. रा. श्री. जोग व प्रा. श्री. के. क्षीरसागर यांनी भाषणें करून श्रद्धांजलि वाहिली.

टिळक-आगरकर जन्मशताब्दि—लोकमान्य कै. लो. बा. गं. टिळक व सुधारकाग्रणी कै. प्रि. गो. ग. आगरकर यांच्या जन्मशताब्दिनिमित्त १३ ते २२ जुलै या अवधींत पुढील व्याख्यात्यांचीं व्याख्यानें झालीं. प्राचार्य वि. के. जोग (१३ जुलै-उद्घाटन), डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे (१४ जुलै), डॉ. रा. शं. वाळिंबे (१५ जुलै), प्रा. गं. बा. सरदार (१८ जुलै), प्रा. वि. स. गोगटे (२० जुलै), म. म. प्रा. द. वा. पोतदार (२३ जुलै—लो. टिळक छायाचित्र अनावरण प्रसंगीं).

दीपावली-वाङ्मय-व्याख्यानमाला—दिवाळी अंकांतील प्रमुख विषयांचें समालोचन करणारी व्याख्यानमाला परिषदेतर्फे यंदा प्रथमच गुंफण्यांत आली. या मालेंत दि. १, २ व ३ डिसेंबरला प्रा. ग. प्र. प्रधान, सौ. पद्मा गोळे व प्रा. प्र. रा. भुपटकर यांनी अनुक्रमें कथा, काव्य व कादंबरी या वाङ्मयप्रकारांचें समालोचन केलें.

भेटी—यंदा पुढील मान्यवरांनी परिषदेस भेटी दिल्या. श्रीमान् बा. ग. खापर्डे (३-५-५६), श्री. आ. श्री. नाईक, पुणें म्यु. कार्पोरेशनचे कमिशनर, (२-५-५६), श्री. ग. त्र्यं. माडखोलकर (११.८-५६), शिक्षणाधिकारी श्री. भांडारकर (२८-८-५६), श्री. पी. टी. नरसिंहाचार्य (२-९-५६), श्री. बाबू वृंदावनलाल वर्मा (१५-९-५६), रा. सा. र. लु. जोशी (२८-९-५६), डे. डायरेक्टर ऑफ एज्युकेशन डॉ. पवार (१०-१-५७).

वाङ्मयेतिहासाला-देणग्या—अध्यक्ष डॉ. शं. दा. पेंडसे यांच्या प्रयत्नाने वाङ्मयेतिहास योजनेतील संपादकांना लेखन-संभावनाद्रव्य देण्यासाठी चालू वर्षांत ३००० रु. च्या देणग्या मिळाल्या आहेत. यापैकी २००० रु.ची देणगी नागपूरच्या लॉ रिपोर्टरचे संचालक श्री. दि. वा. चितळे व त्यांची कुटुंबीय मंडळी यांचेकडून आली. रु. १००० ची देणगी नागपूरचे दानशूर श्रीमान बाबुराव देशमुख यांनी दिली. याशिवाय भोरचे राजे श्रीमंत सदाशिवराव रघुनाथराव पंतसचिव यांनीहि परिषदेच्या शिष्टमंडळाची भेट घेऊन वाङ्मयेतिहास लेखन-कार्यासाठी रु. ५०० ची देणगी दिली. पूर्वीच्या मध्यप्रदेश सरकारकडून योजनेला आर्थिक साहाय्य मिळविण्यासाठी १७ ऑगस्टला मुख्यमंत्री पं. रविशंकर शुक्ल यांची परिषदेच्या शिष्टमंडळाने भेट घेतली. भेटीचे प्रसंगी डॉ. शं. दा. पेंडसे, न्यायमूर्ति अण्णासाहेब मंगळमूर्ति, प्रा. चिं. वि. जोशी, प्रि. श्री. ल. पांढरीपांडे व प्रा. सौ. कुसुमावती देशपांडे उपस्थित होते. मुख्यमंत्र्यांनी 'योजनेचा सहानुभूतिपूर्वक विचार करूं' असें आश्वासन दिलें होतें.

प्रतिनिधित्व—दिल्ली येथे २३, २४, २५ रोजी भरलेल्या आशियाई लेखक संमेलनांत परिषदेतर्फे श्री. प्रभाकर पाध्ये यांनी भाग घेतला. सोलापूर येथे २२, २३ डिसेंबर रोजीं झालेल्या ३९ व्या मराठी नाट्यसंमेलनांत प्रा. चंद्रकुमार डांगे यांनी परिषदेचें प्रतिनिधित्व केलें. कवि कुंजविहारी यांच्या षष्ठ्यब्दी-समारंभास (८-९ डिसेंबर) प्रा. वा. दा. गोखले सोलापूरला गेले होते. त्यांनी परिषदेतर्फे कुंजविहारींचा सत्कार केला. भारत सरकारने नेमलेल्या संस्कृत कमिशनच्या प्रश्नावलीस परिषदेतर्फे जें उत्तर पाठविण्यांत आलें त्याकामीं श्री. म. दा. साठे यांनी साहाय्य केलें.

शुद्ध लेखन समितीचें कार्य :—परिषदेने नियुक्त केलेल्या शुद्ध लेखन समितीकडे ज्या विविध सूचना आल्या त्यांचा विचार समितीच्या दि. १५।४।५६ रोजीं भरलेल्या सभेंत झाला. म. सा. परिषदेच्या चालू शुद्ध लेखनाचा पुनर्विचार करण्याची आवश्यकता पटून या सभेने नवीन नियमांचा एक स्थूल मसुदा तयार केला. या अहवालाचा आणखी विचार करण्यासाठी शुद्ध-लेखन समिति, विद्यापीठांचे व निरनिराळ्या साहित्य संस्थांचे प्रतिनिधि यांची संयुक्त परिषद १७ मार्च १९५७ रोजीं भरली होती. ( परिषदेचा वृत्तान्त चालू अंकांत अन्यत्र दिला आहे. )

कै. डॉ. केतकरांचें स्मारक :—ज्ञानकोशकार कै. डॉ केतकर यांची समाधि पुणें येथे नदीच्या कांठीं असल्यामुळे पुराच्या पाण्याने तिच्या आजूबाजूची जमीन ढासळत आहे. या परिस्थितींत समाधीची जागा बदलणें आवश्यक झाल्यामुळे परिषदेने कॉर्पोरेशनच्या अधिकाऱ्याकडे शिष्टमंडळ नेऊन नवीन जागा देण्याबाबत विनंती–अर्ज दिला. या अर्जाचा विचार होऊन कार्पोरेशनने संभाजी पुलानजीकच्या ( शहराकडील ) कोपऱ्यांत १० × १० फूट इतकी जागा दिली. या जागेचा ताबा ५ एप्रिल १९५७रोजीं मिळाला. प्रस्तुतच्या जागेवरच कै. केतकरांची समाधि हलविण्यांत येणार आहे. कॉर्पोरेशनने जागा देऊन परिषदेला उपकृत केलें

आहे. या कामगिरीबद्दल कार्पोरेशनचे विशेषतः कमिशनर श्री. नाईक व सिटी इंजिनियर श्री. नेऊरगावकर यांचे परिषद मनःपूर्वक आभार मानीत आहे.

संमेलनाध्यक्षांचा सत्कार :—औरंगाबाद येथील ३९ व्या मराठी साहित्य संमेलनाचे नियोजित अध्यक्ष प्रा. अनंत काणेकर यांचा परिषदेतर्फे २७ मार्चला सत्कार करण्यांत आला. अध्यक्षस्थानीं कार्याध्यक्ष प्रा. चिं. वि. जोशी होते. श्री. वि. द. घाटे, श्री. वि. स. खांडेकर, श्री. के. नारायण काळे, प्रा. वा. ल. कुलकर्णी, व प्रा. रा. मि. जोशी यांनी भाषणें करून अध्यक्षांचा गुणगौरव केला.

वरील सत्कार समारंभाचे आधीं महाराष्ट्रांतील एक रसिक विद्वान साहित्यिक कै. पु. मं. लाड, आय्. सी. एस्. यांच्या निधनानिमित्त दुखवटा व्यक्त करण्यांत आला व दुखवटा ठराव कै. लाड यांचे कुटुंबियांकडे पाठविण्यांत आला.

परिषदेस सरकार मान्यता व देणगीः—परिषदेने २ सप्टेंबर रोजीं केलेल्या अर्जाचा विचार करून मुंबई राज्य शिक्षणाधिकाऱ्यांनी परिषदेला " संशोधन व सांस्कृतिक " संस्था म्हणून मान्यता दिली. मान्यतेचें पत्र ३० जानेवारी १९५७ ला परिषदेकडे आलें. यानंतर मान्यतेचें प्रतीक म्हणून रु. १५०० ची देणगीही ( Token grant-in-aid ) शिक्षणाधिकाऱ्याकडून आली. या मान्यतेबद्दल व साहाय्याबद्दल परिषद सरकारी शिक्षणखात्याची आभारी आहे.

साक्षरता कोश :—मुंबई राज्य शिक्षणखात्याने गतवर्षी परिषदेकडे साक्षरता कोशाचें कार्य सोपविलें होतें. तें कार्य प्रा. वा. दा. गोखले यांनीं पुरें करून शिक्षण खात्याकडे सुपूर्त केलें. शिक्षणखात्याने तो कोश प्रसिद्ध केला आहे.

वाङ्मयेतिहास-कार्य :—चालू वर्षी निर्वाहक मंडळाच्या दोन सभा झाल्या. ( ३० मे व २४ मार्च ). प्रा. शं. के. कानेटकर, डॉ. ना. गो. नांदापूरकर व प्रा. वा. दा. गोखले यांचे खंड-संपादकत्वाचे राजिनामे संमत करण्यांत आले. प्रा. कानेटकर यांचे जागीं ( खंड ३ ) प्रा. भ. श्री. पंडित यांची नियुक्ति झाली. खंड ६ बाबत विषयांची विभागणी करण्यांत आली. वाङ्मयेतिहासाचें ( १९५५-५६ ) चें आयव्यय पत्रक संमत करण्यांत आलें. कोशमंडळावर श्री. आ रा भट यांची नियुक्ति करण्यांत आली. अध्यक्ष डॉ. शं. दा. पेंडसे यांनी मिळवून आणलेल्या देणग्यांचा साभार स्वीकार करण्यांत आला. खंड पहिला शक्य तो लिहून घेऊन मग विक्रीची योजना आखण्यांत यावी असेंहि ठरलें

परीक्षाः—डिसेंबर १९५६ मध्ये झालेल्या विविध केंद्रांतून पुढीलप्रमाणे उमेदवार बसले व उत्तीर्ण झाले.

| परीक्षा | बसले | उत्तीर्ण | शें. प्रमाण |
|---|---|---|---|
| प्रथमा | २४४२ | १८६२ | ७७ |
| प्रवेश | १८०६ | १२६० | ६९ |
| प्राज्ञ | ९६० | ५५० | ५७ |
| विशारद | १५० | ७९ | ५३ |
| आचार्य | १२ | २ | १६ |
| | ५३७० | ३७५३ | |

## परीक्षा केंद्रें

| क्रमांक | केंद्र | परीक्षास्थळ | केंद्राधिकारी |
|---|---|---|---|
| १ | गिरगाव | मुं. म. सा. संघ | प्रा. वसंत दावतर |
| २ | दादर | ज. ए. इ. गर्ल्स स्कूल | श्री. स. ह. कुलकर्णी |
| ३ | विलेपार्ले | पार्ले टिळक विद्यालय | श्री. मा. सी. पेंढारकर |
| ४ | वसई | वाघ हायस्कूल | श्री. वा. ल. पंडित |
| ५ | कल्याण | हायस्कूल | श्री. वा. का. मोने |
| ६ | पुणें | नू. म. वि. प्रशाळा | श्री. वि. वि. वोकील |
| ७ | पुणें | रास्ता पेठ हायस्कूल | श्री. द. पि. अत्रे |
| ८ | इंदापूर | आयडियल इं. स्कूल | श्री. वि. शं. केळकर |
| ९ | जुन्नर | न्यू स्कूल | श्री. डी. व्ही. मांडे |
| १० | पणदरे | शाळा क्र. १ | श्री. ह. ना. जगताप |
| ११ | बारामती | शाहू हायस्कूल | श्री. ज. बा. पाटील |
| १२ | वडगाव निंबाळकर | स्वातंत्र्य विद्यामंदिर | श्री. दि. पां. मुंजे |
| १३ | सासवड | म. ए. सो. चे हायस्कूल | श्री. ह. आ. उंब्राणीकर |
| १४ | सातारा | न्यू इं. स्कूल | श्री. मो. रा. वाळंबे |
| १५ | उंब्रज | म. गांधी विद्यालय | श्री. बा. ना. येडेकर |
| १६ | औंध | ट्रेनिंग कॉलेज | प्रि. दि. रं. कुलकर्णी |
| १७ | कराड | श्रीशिवाजी विद्यालय | श्री. वि. गं. सप्रे |
| १८ | कुसूर | अध्यापन विद्यालय | श्री. मुख्याध्यापक |
| १९ | कोरेगाव | न्यू सरस्वति इं. स्कूल | श्री. वि. शं. पुरंदरे |
| २० | चाफळ | समर्थ विद्यामंदिर | श्री. श्री. के. राणे |
| २१ | दहीवडी | म. गांधी विद्यालय | श्री. गं. वा. जोशी |
| २२ | पवारवाडी | न्यू इं. स्कूल | श्री. ग. सु. कद्रूकर |
| २३ | पांचवड | म. गांधी विद्यालय | श्री सी. श्री. बेडकिहाळ |
| २४ | फलटण | हिंदी स्वाध्याय मंडळ | श्री. म. चिं. कान्हेरे |
| २५ | शिरवळ | आदर्श विद्यालय | श्री. कृ. ता. सावंत |
| २६ | सांगली | सिटी हायस्कूल | श्री. के. जि. दीक्षित |
| २७ | अंष्टे | म. गांधी विद्यालय | श्री. एस. डी. महादार |
| २८ | इस्लामपूर | म. फुले विद्यालय | श्री. मा. तु. मोहिले |
| २९ | कवलापूर | पं. नेहरू विद्यालय | श्री. बा. बा. पाटील |
| ३० | कासेगाव | आझाद विद्यालय | श्री. द. भि. घोरपडे |
| ३१ | कुंडल | प्रतिनिधि हायस्कूल | श्री. शं. शि. नेने |
| ३२ | खानापूर | विद्यार्थी बोर्डींग | श्री. ग. कृ. माने |
| ३३ | चिकुर्डे | मुलांची शाळा | श्री. खं. भा. जाधव |
| ३४ | जत | रा. वि. मंदिर | श्री. कृ. पां. जोशी |
| ३५ | शिराळें | न्यू इं. स्कूल | श्री. दा. कृ. हसमनीस |
| ३६ | बांबवडे | जनता हायस्कूल | श्री. रा. तु. भोसले |

| क्रमांक | केंद्र | परीक्षास्थळ | केंद्राधिकारी |
|---|---|---|---|
| ३७ | बुधगांव | हायस्कूल | श्री. मुख्याध्यापक |
| ३८ | भवानीनगर | नाना पाटील विद्यालय | श्री. र. पां. भाट |
| ३९ | भिलवडी | सेकंडरी स्कूल | श्री. गो. ना. आठवले |
| ४० | मिरज | अंबाबाई तालीम संस्था | श्री. ना. कृ. चितळे |
| ४१ | येलूर | येलूर विद्यालय | श्री. वा. ना. नवले |
| ४२ | अहमदनगर | कन्या विद्यामंदिर | श्री. ग. ज. चितांबर |
| ४३ | जामखेड | जनता हायस्कूल | श्री. भा. आ. कचरे |
| ४४ | पाथर्डी | श्री. ति. जै. हायस्कूल | श्री. प. पु. मेहेंदळे |
| ४५ | भिंगार | मिडल स्कूल | श्री. द. बा. डावरे |
| ४६ | सोलापूर | ह दे. हायस्कूल | प्रा. के. पं. मंगळवेढेकर |
| ४७ | श्रीपूर | श्रीविद्यालय | श्री. अ. ग. भावे |
| ४८ | अकलूज | शि. प्र. मं. विद्यालय | श्री. गो. आ. म्हैसकर |
| ४९ | अक्कलकोट | श्रीशहाजी हायस्कूल | श्री ग. म. वैद्य |
| ५० | कुर्डूवाडी | नूतन विद्यालय | श्री. दा. खं. दिवाण |
| ५१ | नातेपुतें | हायस्कूल | श्री. अ. चिं. पाठक |
| ५२ | पंढरपूर | कवठेकर हायस्कूल | श्री. पां. सी. कुलकर्णी |
| ५३ | वार्शी | सुलाखे हायस्कूल | श्री. वा ज. खेर |
| ५४ | मंगळवेढें | इंग्लिश स्कूल | श्री. ज्ञा. सं. कदम |
| ५५ | माढा | लो. बो. हायस्कूल | श्री. ल. दे. सूर्वे |
| ५६ | सांगोला | विद्यामंदिर हायस्कूल | श्री. रा. गो. पांडे |
| ५७ | नाशिक | पेठे विद्यालय | श्री. य. के. खरे |
| ५८ | नाशिक रोड | पुरुषोत्तम इं. स्कूल | श्री. वा. श्री. पुरोहित |
| ५९ | नांदगाव | व्ही. जे. हायस्कूल | श्री. र. त्र्यं. भार्गवे |
| ६० | निफाड | निफाड इं. स्कूल | श्री. ह. वि जोगळेकर |
| ६१ | निवार्णे | शाळा | श्री. नि. गो. पाटील |
| ६२ | पिंपळगांव | हायस्कूल | श्री. भा. पं. पाटील |
| ६३ | मनमाड | जी. आय. पी. इं. स्कूल | श्री. द. वि. केतकर |
| ६४ | मालेगाव | न्यू इं. स्कूल | श्री. मुख्याध्यापक |
| ६५ | लासलगाव | महावीर हायस्कूल | श्री. व. आ. सांगवे |
| ६६ | जळगाव | रा. रू. विद्यालय | श्री. ना. खं. जंगले |
| ६७ | अमळगांव | आदर्श विद्यालय | श्री. द. रा. पाटील |
| ६८ | अमळनेर | प्रताप कॉलेज | प्रा. ल. के. कुलकर्णी |
| ६९ | उंबरखेडें | स. मा. विद्यालय | श्री. त्र्यं. वा. भडकमकर |
| ७० | कानळदे | आदर्श विद्यालय | श्री. मुख्याध्यापक |
| ७१ | शिर्डी | स. ए. सो. चे हायस्कूल | श्री. नि. रा. तळेकर |
| ७२ | चाळीसगाव | आ. बं. हायस्कूल | श्री. भा. य. देशपांडे |
| ७३ | चोपडे | प्रताप विद्यामंदिर | श्री. नी. य. कुलकर्णी |
| ७४ | धरणगाव | पी. आर. हायस्कूल | श्री. मुख्याध्यापक |

| क्रमांक | केंद्र | परीक्षास्थळ | केंद्राधिकारी |
|---|---|---|---|
| ७५ | नगरदेवळे | न्यू इं. स्कूल | श्री. रा. द. पांढरकर |
| ७६ | नांदेड | मराठी शाळा | श्री मुख्याध्यापक |
| ७७ | निंभोरे | मराठी शाळा | श्री. हि. ड. नेमाडे |
| ७८ | पाचोरा | गो. से. हायस्कूल | श्री. द. ल. कुलकर्णी |
| ७९ | पारोळे | हायस्कूल | श्री. मो. रा. कुलकर्णी |
| ८० | फैजपूर | म्युनि. हायस्कूल | श्री. मुख्याध्यापक |
| ८१ | बहादरपूर | रा. का. मिश्र विद्यामंदिर | श्री. ल. ह. भाकरे |
| ८२ | भडगाव | न्यू इं स्कूल | श्री. गो. गो. तेलंग |
| ८३ | भालोद | न्यू इं. स्कूल | श्री. भा. मो. पाटील |
| ८४ | भुसावळ | द. शि. विद्यालय | श्री. एस. के. काळे |
| ८५ | शेंदुर्णी | न्यू इं. स्कूल | श्री. य. ब. भोकरे |
| ८६ | सावदा | आ. गं. हायस्कूल | श्री. स. भि. वारके |
| ८७ | धुळें | आधाव प्रा. ट्रे. कॉलेज | प्रा. हि. मु. पाटील |
| ८८ | तळोदें | के. डी. हायस्कूल | श्री. तु. सो. पटेल |
| ८९ | नरडाणे | विकास विद्यालय | श्री. गो. वा. जोग |
| ९० | नंदूरबार | म्युनि. हायस्कूल | श्री. शं. रा. जोशी |
| ९१ | प्रकाशे | स. वि. मंदिर | श्री. मुख्याध्यापक |
| ९२ | शहादे | न्यू इं. स्कूल | श्री. गो. य. जोशी |
| ९३ | शिंदखेडें | न्यू इं. स्कूल | श्री. पं. स. करंजीकर |
| ९४ | साक्री | न्यू इं. स्कूल | श्री. एस्. एस्. शहा |
| ९५ | अलिबाग | इंडस्ट्रीयल हायस्कूल | श्री. वि. दा. परांजपे |
| ९६ | पनवेल | ट्रेनिंग कॉलेज | श्री. वे. से. गजेंद्रगडकर |
| ९७ | महाड | परांजपे विद्यामंदिर | श्री. वि. त्रिं. चांदे |
| ९८ | रत्नागिरी | महिला विद्यालय | सौ. मालती जोशी |
| ९९ | आचरे | न्यू इं. स्कूल | श्री. य. अ. नाबर |
| १०० | कट्टा | वराडकर हायस्कूल | श्री. चं वि. वराडकर |
| १०१ | कळकवणें | शाळा | श्री. गो. स. चिंगळे |
| १०२ | कणकवली | एस्. एम्. हायस्कूल | श्री. बा. सी. सावंत |
| १०३ | जैतापूर | न्यू इं. स्कूल | श्री. ग. ना. सिनकर |
| १०४ | दापोली | नॅशनल हायस्कूल | श्री. पं. मु. जोशी |
| १०५ | मालवण | टोपिवाले कन्याशाळा | श्री. वि. अ. आजगावकर |
| १०६ | वेंगुर्ले | पाटकर हायस्कूल | श्री. रा. ह. गांवस्कर |
| १०७ | सावंतवाडी | कळसूलकर हायस्कूल | श्री. रा. ज. तेंडोलकर |
| १०८ | कोल्हापूर | राजाराम हायस्कूल | श्री. गु. ह. कोप |
| १०९ | इचलकरंजी | हायस्कूल | श्री. श्री. मा. दाते |
| १०० | गडहिंग्लज | एम. आर. हायस्कूल | श्री. वि. के. परुळेकर |
| १११ | गारगोटी | शाळा | श्री. भा. म. सावे |
| ११२ | ढोलगरवाडी | राष्ट्रभाषा विद्यालय | श्री. स. मो. नौकुडकर |

| क्रमांक | केंद्र | परीक्षास्थळ | केंद्राधिकारी |
|---|---|---|---|
| ११३ | बेळगांव | वाङ्मयचर्चा मंडळ | श्री. वा. आ. सावंत |
| ११४ | अकोळ | इंग्लिश स्कूल | श्री. द. गो. कुंभोजकर |
| ११५ | अंकली | एस. ए. इं. स्कूल | श्री. आ. दा. नदाफ |
| ११६ | निपाणी | म्युनि. हायस्कूल | श्री. मुख्याध्यापक |
| ११७ | अंकोला | पीपल्स मल्टिपरपज हायस्कूल | श्री. शे. वें. पिकळे |
| ११८ | अकोला | सीताबाई आर्टस् कॉलेज | प्रि. ना. रा. केळकर |
| ११९ | अमरावती | रामकृष्ण विद्यालय | श्री. दा. अं. पंत |
| १२० | हैद्राबाद | म. सा. परिषद् | प्रा. रा. ब. माढेकर |
| १२१ | औरंगाबाद | सरस्वतिभुवन हायस्कूल | श्री. न. दा. वाघ |
| १२२ | औरंगाबाद | हिंदी प्रचारसभा | श्री. शु. मु. धानुका |
| १२३ | उपळे माकडाचे | एच्. जी. हायस्कूल | श्री. रा. मा. घोगरे |
| १२४ | उमरी | नूतन विद्यालय | श्री. रं. श्री. कुलकर्णी |
| १२५ | उमरगा | भारत विद्यालय | श्री. श्री. रं. कुलकर्णी |
| १२६ | औसा | सरकारी हायस्कूल | श्री. गंगाधरराव शास्त्री |
| १२७ | कलमनुरी | माध्यमिक शाळा | श्री. वि. पं. भाले |
| १२८ | गुंजोटी | श्रीकृष्ण विद्यालय | श्री. मुख्याध्यापक |
| १२९ | देगलूर | मानव्य विकास विद्यालय | श्री. मुख्याध्यापक |
| १३० | नांदेड | प्रतिभा निकेतन | श्री. वि. द. सर्जे |
| १३१ | परभणी | विद्यामंदिर | श्री. अं. भा. पाठक |
| १३२ | अंबेजोगाई (मोमि.) | योगेश्वरी विद्यालय | श्री. ए. मा. कुलकर्णी |
| १३३ | शफेपूर | सरकारी माध्यमिक शाळा | श्री. मो. आ. पाठक |
| १३४ | सेलू | नूतन विद्यालय | श्री. सो. ना. कुलकर्णी |
| १३५ | हिंगोली | भारतीय विद्यामंदिर | श्री. राजेश्वरराव देशपांडे |
| १३६ | इंदूर | म. सा. सभा भवन | श्री. सी. का. देव |

यावर्षी झालेल्या परीक्षांत सर्व केंद्रांतून पुढील उमेदवार पहिले आले व त्यांना परिषदे-तर्फे पारितोषिकें देण्यांत आलीं.

प्रथमा— लीलावती रामचंद्र देवळालकर, बहाद्दरपूर, रु. १०.
प्रवेश — विलास पंढरीनाथ वाडकर, निपाणी, रु. १५.
प्राज्ञ ——यमुना भार्गव जोगळेकर, गिरगांव, रु. २०.
विशारद—नलिनी कृष्ण अलूरकर, पुणें, रु. २५.

महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका—चालू वर्षी श्री. वा. रा. ढवळे यांच्या संपादकत्वाने चार अंक निघाले. ‘पत्रिके’ ला परतभेट म्हणून पुढील नियतकालिकें येतात.

दैनिकें—लोकसत्ता, सकाळ, तरुणभारत (पुणें व नागपूर), लोकशक्ति.

त्रिसाप्ताहिक—केसरी.

अर्धसाप्ताहिक—मराठवाडा.

साप्ताहिकें——मौज, नवयुग, साधना, धनुर्धारी, विवेक, चिकित्सक, अर्थ, महाराष्ट्र (नागपूर), प्रबोधचंद्रिका, मालवणपत्रिका, युगांतर, सोवियत युनियन समाचार, पीपल्स राज, सोवियत भूमि, लोकमत.

अनुक्रमणिका

मासिकें—विशालभारत, अजंता, देवनागर, राष्ट्रभारती, राष्ट्रवाणी, किर्लोस्कर, स्त्री, मनोहर, सह्याद्रि, सत्यकथा, चित्रमयजगत्, व्यायाम, पुरुषार्थ, महाराष्ट्र, सुदर्शन, युगवाणी, सुषमा, महात्मा, प्रसाद, नवभारत, प्रेमबोध, महाराष्ट्रविस्तार, धर्मचक्र, भारतमित्र, एकता, अमृत, नवल, पी. ई. एन., जयभारती, साहित्यसहकार, बालमित्र, शुक्लेंदु, सर्वोदय, चालना, सन्मति, प्रतिष्ठान, वीरशैव, यशवंत, शालापत्रक, उद्यम.

पाक्षिकें—नागरी जीवन.

त्रैमासिकें—ज्ञानेश्वर, तत्त्वज्ञानमंदिर, भारत इतिहास संशोधन त्रैमासिक, मराठी संशोधन पत्रिका, Bulletin of the Deccan College Post-Graduate Research Institute, आलोचना, गांधीमार्ग. The Journal of the Tanjore Sarasvati Mahal Library

आभार—परिषदेच्या कार्यात अनेकांचे अनेक रीतींने साहाय्य होत असतें. या साहाय्याबद्दल परिषद् त्यांची आभारी आहे. परिषदेच्या नियामक मंडळाचे सदस्य प्रा. चंद्र-कुमार डांगे यांनीं चालू वर्षात स्मृतिदिन–व्याख्यानादि कार्यक्रम घडवून आणण्यांत फार साहाय्य केलें.

वा. दा. गोखले
अ. गं. मंगरुळकर
वां. रं. सुंठणकर
चिटणीस.

---

# महाराष्ट्र–साहित्य–परिषद्

## ताळेबंद–पुरवणी ( प्रकाशननिधीबाबत )

| | | | रु. | आ. | पै |
|---|---|---|---|---|---|
| सुरवातीचा स्टॉक – १९५६–५७. | ... | | ६,१६७ | ० | ० |
| – अखेरीचा स्टॉक – दि. ३१–३–१९५७. | | | २,६२५ | १४ | ० |
| | | | ३,५४१ | २ | ० |
| चालू वर्षातील विक्री. | ... | | २,८६६ | १ | ३ |
| – गेल्या वर्षातील येणें. | ... | | १८३ | ३ | ६ |
| | | | २,६८२ | १३ | ९ |
| + चालू वर्षातील येणें. | ... | | ६६३ | ३ | ६ |
| | | | ३,३४६ | १ | ३ |
| वर्षात कमी झालेला माल. | | | ३,५४१ | २ | ० |
| विक्री झालेल्या मालाची किंमत. | | (–) | ३,३४६ | १ | ३ |
| तूट ( खराब झालेल्या पुस्तकांची किंमत ) | | | १९५ | ० | ९ |

# महाराष्ट्र–साहित्य–

दिनांक १ एप्रिल १९५६ ते दिनांक ३१ मार्च,

| खर्च | रु. आ. पै. | रु. आ. पै. |
|---|---|---|
| **संस्था खर्च :** | | |
| पगार व प्रॉव्हिडंट फंड. | ३,८९५–१५–० | |
| म्युनिसिपल कॉर्पोरेशन कर व भुअी भाडें. | ११३– ०–० | |
| वीज व दिवाबत्ती. | १०२–१५–६ | |
| छपाई | २८०– २–३ | |
| सादील | ५९– ५–३ | |
| टपाल व तार. | २१२– ५–९ | |
| प्रवास खर्च व प्रचार. | ३५५– ९–० | |
| आतिथ्य. | १७४– ४–० | ५,१९३– ८–९ |
| **सभा व उपसमिति :** | | |
| संशोधन समिती. | ५८–१०–० | |
| कार्यकारी व नियामक मंडळ. | ६५४–१०–६ | |
| शाखासभा. | १०२– ०–० | |
| उपसमिति. | ४८–१०–० | |
| परीक्षा खर्च. | ८,५५८– ९–६ | |
| "पत्रिका" खर्च (छपाअी व टपाल). | ३,९४७– ८–६ | |
| किरकोळ. | २१५– ५–९ | |
| घसारा. | ३००– ०–० | १३,८८५– ६–३ |
| चालू सालांतील खर्चीपेक्षां जमा अधिक | | ४,५९९–१०–० |
| एकूण...रु.... | ... | २३,६७८– ९–० |

तपासलें, बरोबर आहे. बॉम्बे पब्लिक ट्रस्ट ॲक्टप्रमाणें अलाहिदा दाखला दिला आहे.

(सही) जी. एम्. ओक (चार्टर्ड अकौंटंटस्) ६-४-५७.

# परिषद्, पुणें २.

## १९५७ अखेर मुदतीचें जमाखर्चाचें पत्रक.

| जमा | रु. आ. पै. | रु. आ पै |
|---|---|---|
| देणग्या : | | |
| माधवराव पटवर्धन साहित्य मंदिर. | २७२– ०–० | |
| पुणें म्युनिसिपल कॉर्पोरेशन | २००– ०–० | |
| सरकारी ग्रँट | १,५००– ०–० | १,९७२– ०–० |
| वर्गणी : | | |
| साधारण सभासद. | १,७७२– ०–० | |
| संलग्न संस्था. | ८६– ०–० | |
| "पत्रिका" | १६७– ८–० | २,०२५– ८–० |
| व्याज | ... | २०८–१०–० |
| ट्रस्टींकडून व्याजांतील जमा | .... | १,०००– ०–० |
| किरकोळ जमा. | ... | ८३–१२–० |
| परीक्षा शुल्क. | .... | १७,०५१– ४–० |
| "पत्रिका." | ... | १,३३७– ७–० |
| एकूण....रु.... | ... | २३,६७८– ९–० |

# महाराष्ट्र-साहित्य-
## दिनांक ३१ मार्च १९५७

| निधी व देणीं. | रु. आ. पै. | रु. आ. पै. |
|---|---|---|
| **सामान्य निधि ( म. सा. परिषद् ) :** | | |
| मागील ताळेबंदाप्रमाणे. | १७,९८५–८–११ | |
| अधिक : चालू सालांतील अधिक जमा. | (+) ४,५९९–१०–० | २२,५८५–३–११ |
| **इमारत निधि :** | | |
| मागील ताळेबंदाप्रमाणे. | ... ... | २३,९३८–२–० |
| **ग्रंथालय निधि :** | | |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | १५,५९२–८–० | |
| अधिक : परीक्षणासाठी आलेल्या पुस्तकांची किंमत. | (+) ९७–१२–० | १५,६९०–४–० |
| **इतिहास योजना :** | | |
| मागील ताळेबंदाप्रमाणे. | ८९४–७–० | |
| अधिक : चालू सालांतील जमा | (+) २,५५३–१५–० | |
| | ३,४४८–६–० | |
| वजा : चालू सालांतील खर्च ... | (–) ३५५–०–९ | ३,०९३–५–३ |
| **चिपळूणकर स्मारक निधि :** | ... | |
| मागील ताळेबंदाप्रमाणे. | | १७,१४०–२–० |
| **प्रकाशन निधि ( पारितोषिक ):** | ... | |
| मागील ताळेबंदाप्रमाणें. | | २०४–०–० |
| **सामान्य निधि ( विश्वस्तांकडील ) :** | ... | |
| दि. ३१-३-१९५७अखेर जमा–बाकी. | | १९,८९३–०–१ |
| **प्रॉव्हिडंट फंड ( स्टाफ ) :** | | |
| मागील ताळेबंदाप्रमाणें. | १,५०६–१५–६ | |
| अधिक : चालू सालांतील जमा. | (+) २३७–१४–० | |
| व्याजाबद्दल | (+) २१–१४–० | १,७६६–११–६ |
| **घसारा निधि :** | | |
| मागील ताळेबंदाप्रमाणे. | ३,६००–०–० | |
| अधिक : चालू सालांतील जमा. | (+) ३००– ०–० | ३,९००–०–० |
| **प्रकाशन निधि :** | | |
| मागील ताळेबंदाप्रमाणें. | ८,८६४–३–११ | |
| वजा : चालू सालांतील तूट. | (–) १९५–०–९ | ८,६६९–३–२ |
| **इतर देणीं :** | | |
| तहह्यात वर्गणी | | १८१–०–० |
| एकूण...रु.... | | १,१७,०६०-१४-११ |

तपासलें, बरोबर आहे. बॉम्बे पब्लिक ट्रस्ट ॲक्टप्रमाणे अलाहिदा दाखला दिला आहे.

## परिषद्, पुणें २.

### रोर्जींचा ताळेवंद

| जिंदगी व येणीं | रु. आ. पै. | रु. आं. पै. |
|---|---|---|
| इमारत (पद्दतर खर्च) लीज–होल्ड जागेवरः | | |
| मागील ताळेवंदाप्रमाणे. | | ४५,०८३–५–६ |
| फर्निचर व डेडस्टॉक | | |
| मागील ताळेवंदाप्रमाणे. | २,७६७–२–९ | |
| अधिक : चालू सालांतील खरेदी. | +१२८-११–० | २,८९५-१३–९ |
| सायकल ( खरेदीने ) : | | |
| मागील ताळेवंदाप्रमाणे. | | २९३–८–० |
| ग्रंथालय खातें : | | |
| मागील ताळेवंदाप्रमाणे. | ११,६४४–८–० | |
| अधिक : चालू सालांतील खर्च | +३५१–८–३ | |
| अधिक : परीक्षणासाठी आलेल्या पुस्तकांची किंमत. | +९७–१२-० | १२,०९३–१२-३ |
| रोखे आणि शेअर्स : | | |
| ४ टक्के बॉम्बे म्यु. डिबेंचर्स दर्शनी किं. रु. ५०० | | |
| ३ टक्के डेव्ह. लोन. द. किं.रु. १०८०० | | |
| ३ टक्के कन्व्हर्शन लोन १९४६ द. किं. रु २७०० | १४,०००–०–० | |
| २५ शेअर्स बॉम्बे स्टेट को–ऑपरेटिव्ह बँक लिमिटेडचे प्रत्येकीं रु. ५० चा. | १,२५०–०–० | |
| २३ शेअर्स सेन्ट्रल प्रॉव्हिन्स रेल्वे कं. चे प्रत्येकीं रु. १०० चा. | २,३००–०–० | |
| ३॥ टक्के १० वर्षे ट्रेझरी सेव्हिंग्ज डिपॉझिट सर्टिफिकेट | १३,०००–०–० | ३०,५५०–०–० |
| कायम ठेव(बँक ऑफ महाराष्ट्र लि.,पुणें)कडे | ... | ३,०००–०–० |
| प्रकाशन खातें (शिल्लक पुस्तकाची किंमत),: | | |
| मा. चिटणिसांनी दाखला दिल्याप्रमाणे व त्यांत दिलेल्या किंमतीप्रमाणें. | ... | २,६२५–१४-० |
| येणीं ( असुरक्षित व शहाजोग ). | ... | ६६३–३–६ |
| अखेर शिल्लक : | | |
| रोख हातांत. ... | १२८–०–९ | |
| पुणें सेन्ट्रल को–ऑप. बँक लि., पुणें. | ६०-१३-६ | |
| बँक ऑफ महाराष्ट्र लि., पुणें. | १५,५५८-१२-१ | |
| स्टेट बँक ऑफ इंडिया, | २,३४१–०–१ | |
| पुणें सेन्ट्रल को–ऑप. बँक लि.(प्रॉ. फंड.) | १,७६६-११-६ | १९,८५५–५-११ |
| एकूण....रु.... | ... | १,१७,०६०-१४-११ |

( सही ) जी. एम्. ओक ( चार्टर्ड अकौंटंट्स् ) ६-४-५७.

अनुक्रमणिका

# महाराष्ट्र–साहित्य

१९५७–५८ चा

जमा

| खातें | अंदाज १९५६–५७ रु. | आ. | पै. | प्रत्यक्ष जमा १९५६–५७ रु. | आ. | पै. | अंदाज १९५७–५८ रु. | आ. | पै. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ट्रस्टींकडून येणारें व्याज | १००० | ० | ० | १००० | ० | ० | १००० | ० | ० |
| साधा. सभासद वर्गणी | २२०० | ० | ० | १७७२ | ० | ० | २००० | ० | ० |
| पत्रिका वर्गणी | २०० | ० | ० | १६७ | ८ | ० | १५० | ० | ० |
| संलग्न संस्था वर्गणी | ८५ | ० | ० | ८६ | ० | ० | ८५ | ० | ० |
| ग्रंथविक्री | ३००० | ० | ० | २८६६ | १ | ३ | २००० | ० | ० |
| परीक्षा शुल्क | १२५०० | ० | ० | १७०५१ | ४ | ० | १३००० | ० | ० |
| मा. प. सा. देणगी | ३०० | ० | ० | २७२ | ० | ० | ३०० | ० | ० |
| इतर व्याज | २०० | ० | ० | २०८ | १० | ० | २०० | ० | ० |
| संमेलन | २०० | ० | ० | | | | २०० | ० | ० |
| पत्रिका | | | | १३३७ | ७ | ० | १००० | ० | ० |
| किरकोळ जमा | | | | ८३ | १२ | ० | ७५ | ० | ० |
| पुणें म्युनि. कार्पो. देणगी | | | | २०० | ० | ० | २०० | ० | ० |
| सरकारी देणगी | | | | १५०० | ० | ० | | | |
| | | | | | | | २०२१० | ० | ० |
| | | | | तूट | | | ४५६१ | ० | ० |
| | १९६८५ | ० | ० | २६५४४ | १० | ३ | २४७७१ | ० | ० |

अनुक्रमणिका

# परिषद्, पुणें २.

## अर्थसंकल्प

### खर्च

| खातें | अंदाज १९५६–५७ | | | प्रत्यक्ष खर्च १९५६–५७ | | | अंदाज १९५७–५८ | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | रु. | आ. | पै | रु. | आ. | पै | रु. | आ. | पै |
| पगार खातें | ३८०० | ० | ० | ३,७७७ | ० | ० | ३९३३ | ० | ० |
| प्रॉ. फंड खातें | १२२ | ० | ० | ११८ | १५ | ० | १२५ | ० | ० |
| वीज खातें | १०० | ० | ० | + १०२ | १५ | ६ | १०० | ० | ० |
| भुईभाडें | १५ | ० | ० | + ३० | ० | ० | १५ | ० | ० |
| कार्पोरेशन कर | ९८ | ० | ० | ९८ | ० | ० | ९८ | ० | ० |
| कार्यालय छपाई | ३०० | ० | ० | २८० | २ | ३ | ३०० | ० | ० |
| कार्यालय टपाल | २५० | ० | ० | २१२ | ५ | ९ | २५० | ० | ० |
| सादील | १०० | ० | ० | ५९ | ५ | ३ | १०० | ० | ० |
| आतिथ्य | २०० | ० | ० | १७४ | ४ | ० | २०० | ० | ० |
| उपसमिति | ५० | ० | ० | ४८ | १० | ० | ५० | ० | ० |
| किरकोळ | ३०० | ० | ० | २१५ | ५ | ९ | २५० | ० | ० |
| कार्यकारी नियामक | ६०० | ० | ० | + ६५४ | १० | ६ | ७०० | ० | ० |
| पत्रिका छपाई टपाल | ३००० | ० | ० | + ३,९४७ | ८ | ६ | ४००० | ० | ० |
| इमारत दुरुस्ती | १०० | ० | ० | ० | ० | ० | १००० | ० | ० |
| नवीन सामान | ५०० | ० | ० | १२८ | ११ | ० | १२०० | ० | ० |
| निवडणूक (त्रैवार्षिक) | २०० | ० | ० | ० | ० | ० | १००० | ० | ० |
| परीक्षा खातें | ८००० | ० | ० | + ८५५८ | ९ | ६ | ९००० | ० | ० |
| शाखासभा | २५० | ० | ० | १०२ | ० | ० | १५० | ० | ० |
| प्रकाशन | १०० | ० | ० | ० | ० | ० | ५०० | ० | ० |
| प्रवास, प्रचार | ८०० | ० | ० | ३५५ | ९ | ० | ५०० | ० | ० |
| ग्रंथसंग्रहालय | ५०० | ० | ० | ३५१ | ८ | ३ | ५०० | ० | ० |
| घसारा | ३०० | ० | ० | ३०० | ० | ० | ३०० | ० | ० |
| संशोधन समिति | ५०० | ० | ० | ५८ | १० | ० | ५०० | ० | ० |
| | २०१८५ | ० | ० | १९५७४ | २ | ३ | २४७७१ | ० | ० |

# साभार-स्वीकार

केशव भिकाजी ढवळे, श्रीसमर्थ-सदन, गिरगाव, मुंबई, प्रकाशनें:—

१ रेषा–(स्फुट कविता) वा. रा. ढवळे; २ रु.

२ भावसरिता–(स्फुट कविता) वा. भा. दामले; ३ रु.

३ गीतामृत–नी. बा. परुळेकर; ८ आ.

४ नाटकाच्या गोष्टी भाग ४ व ५–पु. रा. लेले व वि. सी. गुर्जर; ८ आणे.

५ ऐका हें–सौ. कुमुदिनी रांगणेकर; १२ आणे.

६ सम्राट् रघु–राजारामशास्त्री नाटेकर; १ रु.

७ श्रीसमर्थ रामदास–वि. वा. हडप; १२ आणे.

८ रामदास-नवमीनिमित्त श्रीसमर्थ प्रसाद–

९ मराठीचिये नगरीं–नियतकालिक अंक फेब्रुवारी १९५७; वा. वर्गणी १॥ रु.

व्हीनस प्रकाशन पुणें २:—

१० कालिदास–वा. वि. मिराशी; ६ रु.

११ मराठी वाङ्मयाचा परामर्श (द्वि. आ.)– गं. भा. निरंतर; ७ रु.

१२ छत्रपति श्रीशिवप्रभूचें चरित्र–वि. स. वाकसकर; ३ रु. २ आ.

१३ विवेक-मंडन-श्री. म. माटे; ३ रु. ४ आ.

कॉंटिनेंटल प्रकाशन, टिळक रस्ता, पुणें २. प्रकाशनें :—

१४ तांबे : एक अध्ययन–रा. अ. काळेले; ४ रु.

१५ विस्कटलेलें घरटं–श्रीपाद जोशी; ३ रु.

१६ रानभूल–ए. वि. जोशी; ४॥ रु.

मौज प्रकाशन, खटाववाडी, मुंबई ४.

१७ चंद्रहास–आख्यान– (खंडकाव्य) सौ. लक्ष्मीबाई ना. कुलकर्णी; ना. नी. कुलकर्णी, ४१७ गुरुवार पेठ, निपाणी (जि. बेळगांव); ८ आ.

१८ भारताचा आर्थिक विकास–प्र. चिं. शेजवलकर; इनामदार बंधु प्रकाशन, पुणें २; ३ रु.

ग्रामीण प्रकाशन—(बालविभाग) संस्था, धनगांव पो. भिलवडी, (जि. सातारा)

१९ जातीला जागा नाहीं!–म. भा. भोसले; ६ आणे.

२० नाट्यसप्तक– म. भा. भोसले; ८ आणे.

२१ भिकारी राजपुत्र–म. भा. भोसले; ६ आणे.

२२ दहा एकांकिका–संपा. श्री. र. भिडे; श्रीरंग प्रकाशन, विजापूर.

२३ शोधांच्या नवलकथा–ना. वा. कोगेकर, लाखाणी बुकडेपो, मुंबई ४; १२ आ.

२४ विवेकसिंधु–संपा. कृ. पां. कुलकर्णी; श्री. लेखनवाचन भांडार; पुणें २; १२ रु.

२५ तीन कथा आणि दहा कविता–अनिरुद्ध पुनर्वसु; ना ग. आठवले, १५३/४ नारायण पेठ, पुणें २; १ रु.

२६ नकलाकार भोंडे (व्यक्ति आणि कला)–वामनराव परांजपे, र. पां. भोंडे, २० बुधवार, पुणें २; २॥ रु.

२७ अंधारांतील लावण्या–संपा. य. न. केळकर, ठोकळ प्रकाशन, ६२ बुधवार, पुणें २; ४ रु.

---

# महाराष्ट्र-साहित्य-परिषद्, पुणें २

## शुद्धलेखन-परिषदेचा वृत्तान्त

परिषदेच्या कार्यकारी मंडळाचा (२२-३-१९५३) ठराव क्र. १६ आणि वार्षिक साधारण सभेचा (१३-६-१९५४) ठराव यांच्या अनुसार अस्तित्वांत येऊन कार्य करणाऱ्या शुद्धलेखन-समितीच्या परिषदेच्या कार्यालयांत दि. २५-३-५६, २६-३-५६ आणि १५-४-५६ या तीन दिवशीं बैठकी झाल्या. म. सा. परिषदेच्या शुद्धलेखन-नियमांचा पुनर्विचार करण्यांत यावा, असें मत या तिन्ही बैठकींत व्यक्त झालें व त्यास अनुसरून समितीने नव्या नियमांचा एक स्थूल मसुदा तयार केला. हा मसुदा दि. १७ मार्च १९५७-ला भरलेल्या व्यापक परिषदेंत विचारासाठी घेण्यांत आला. परिषदेंत मसुद्याच्या अनुरोधाने जें कार्य झालें त्याचा वृत्तांत पुढे दिला आहे :—

म. सा. परिषदेच्या साधारण सभेच्या आदेशानुसार रविवार, १७।३।१९५७ या दिवशीं परिषदेच्या चिपळूणकर सभागृहांत वेगवेगळ्या विद्यापीठांचे व साहित्यसंस्थांचे प्रतिनिधि आणि परिषदेच्या शुद्धलेखन-समितीचे सदस्य यांची परिषद भरली. या परिषदेसाठी पुढील संस्थांना प्रतिनिधि पाठविण्याची विनंती केली होती—

१ शिक्षणखातें, मुंबई राज्य; २ पुणें, मुंबई, नागपूर, उस्मानिया, ना. दा. ठा. वुइमेन्स, आग्रा, बडोदें, गुजरात, कर्नाटक, बनारस व सागर हीं विद्यापीठें; ३ मुंबई मराठी साहित्य संघ, विदर्भ साहित्य संघ व मराठवाडा साहित्य परिषद्; ४ महाराष्ट्र मुद्रण परिषद् व मुद्रित शोधक मंडळ, पुणें.

त्यांतील पुढील संस्थांनी आपले प्रतिनिधि पाठविले. ते असे: १ शिक्षणखातें, मुंबई राज्य—प्रा. मं. वि. राजाध्यक्ष; २ मुंबई विद्यापीठ—प्रा. अ. का. प्रियोळकर; ३ पुणें विद्यापीठ—डॉ. शं. गो. तुळपुळे; ४ ना. दा. ठा. वुईमेन्स विद्यापीठ—प्रा. गं. बा. सरदार; ५ एस्. एस्. सी. बोर्ड—डॉ. ग. श्री. खैर; ६ कर्नाटक विद्यापीठ—डॉ. के. ना. वाटवे; ७ मुंबई मराठी साहित्य संघ—प्रा. वसंत दावतर; ८ मराठवाडा साहित्य परिषद्—श्री. भालचंद्र कहाळेकर; ९ महाराष्ट्र मुद्रण परिषद्—श्री. वि. अ. पटवर्धन; १० मुद्रित शोधक मंडळ—श्री. ना. के. महाजन; ११ म. सा. परिषदेच्या शुद्धलेखन समितीचे पुढील सदस्य—श्री. य. ग. फफे, प्रा. रा. श्री. जोग, प्रा. वा. दा. गोखले व प्रा. अ. गं. मंगरूळकर (निमंत्रक). कार्याध्यक्ष प्रा. चिं. वि. जोशी निमंत्रित म्हणून उपस्थित.

शुद्धलेखन समितीचे निमंत्रक प्रा. अ. गं. मंगरूळकर यांनी आरंभीं सर्व प्रतिनिधींचें म. सा. परिषदेच्या वतीने व परिषदेचे चिटणीस या नात्याने स्वागत केलें; तसेंच, ज्या वरील संस्थांनी अगत्यपूर्वक आपले प्रतिनिधि पाठविले त्यांचे मन:पूर्वक आभार मानिले. नंतर मंगरूळकर यांनी शुद्धलेखन परिषदेच्या अध्यक्षपदासाठी श्री. य. ग. फफे यांचें नांव सुचविलें. त्याला मराठवाडा साहित्य परिषदेचे श्री. भालचंद्र कहाळेकर यांनी अनुमोदन

दिल्यावर श्री. फफे यांनी परिषदेचें अध्यक्षपद स्वीकारिलें. प्रारंभीं अध्यक्ष श्री. फफे यांनी या कामीं सर्वांनी सहकार्य करावें, अशी प्रतिनिधींना विनंती केली. त्यानंतर मंगरूळकर यांनी या प्रकरणीं कांही ऐतिहासिक, प्रास्ताविक व घटनात्मक माहिती सांगितली आणि शुद्धलेखन समितीने तयार केलेल्या व नियामक मंडळ आणि वार्षिक साधारण सभा यांच्या द्वारा आलेल्या नियमांचा मसुदा चर्चेसाठी घ्यावा, अशी विनंती केली. चर्चेच्या ओघांत वि. सा. संघ, नागपूर विद्यापीठ, डॉ. कोलते, डॉ. मा. गो. देशमुख, डॉ. य. खु. देशपांडे व मुद्रण परिषद् यांनीं पाठविलेल्या पत्रांतील व नियमावलींतील आवश्यक तो भाग त्यांनी वाचून दाखविला. चर्चा सुरू झाली व तींत पुढील गोष्टी एकमताने ठरल्या.

१. यापुढे 'शुद्धलेखनाचे नियम' असें शीर्षकाच्या स्थानीं न म्हणतां 'मराठीच्या लेखनाचे नियम' असें म्हणावें.

२. 'शुद्धलेखनांत (१) अनुस्वार आणि (२) इ-कार व उ-कार यांचें ऱ्हस्वदीर्घत्व यांचाच विचार करावा' हा भाग गाळावा.

३. मराठीच्या लेखनाचीं सामान्य तत्त्वें: 'मराठींत लेखन सामान्यतः उच्चारानुसार असावें' हें मान्य करावें आणि त्यापुढे मसुद्यामधील 'हा उच्चार शिष्टांच्या तोंडचा व तो सभा-व्याख्यानादि प्रसंगीं केलेला असावा' हें स्पष्टीकरण कंसामध्ये घालावें.

यानंतर मसुद्यामधील अनुस्वारविषयक नियमांची सर्वसाधारण चर्चा सुरू झाली. तींत अनुस्वार-नियम (i)' मान्य करावा, असें ठरलें. त्यानंतर बरीच चर्चा झाल्यानंतर पुढील ठराव शुद्धलेखन परिषदेने एकमताने मान्य केला व तो तत्संबद्ध अधिकारि-मंडळाकडे पाठवावा, असें ठरलें.

## ठराव

शुद्धलेखनपरिषदेने आलेल्या लेखननियमांच्या मसुद्याचा स्थूल विचार केला. त्यांत असें दिसून आलें की, हा विषय सार्वजनिक महत्त्वाचा असल्यामुळे त्याविषयी अंतिम निर्णय करण्यापूर्वी त्याचा विचार याहूनही अधिक व्यापकपणाने होणें आवश्यक आहे. म्हणून वरील परिषदेची अशी अगत्याची शिफारस आहे की, महाराष्ट्र–साहित्य–परिषदेनें या कामीं पुढाकार घेऊन महाराष्ट्रांतील साहित्य–संस्था, वृत्तसंस्था, सरकार, विद्यापीठें इत्यादि संस्थांना प्रत्येकीं तीन-तीन प्रतिनिधि स्वखर्चाने पाठविण्याची विनंती करावी. याव्यतिरिक्त परिषदेच्या कार्यवाहीसाठी जो अधिक आर्थिक बोजा सोसावा लागेल तो सरकारने या विषयाचें महत्त्व ओळखून प्रामुख्याने सोसावा.

वरील ठरावानुसार पुढील संस्थांना व व्यक्तींना निमंत्रणें पाठवावीं, असेंही ठरलें. शुद्धलेखन–परिषदेंतील सर्व संस्था, उस्मानिया विद्यापीठ, महाराजा सयाजीराव बडोदें विद्यापीठ, सागर विद्यापीठ, बनारस विद्यापीठ व मराठी पत्रकार परिषद्.

— अ. गं. मंगरूळकर
निमंत्रक.

अनुक्रमणिका

# महाराष्ट्र-साहित्य-परिषद्-प्रकाशनें

| | | |
|---|---|---|
| १. मराठी भाषेचा व वाङ्मयाचा इतिहास ( मानभाव अखेर ) लेखक — कै. वा. अ. भिडे ( प्रती शिल्लक नाहींत ) | | |
| २. म. सा. परिषद्–इतिहास ले. म. म. प्रा. द. वा. पोतदार | मूल्य ३ | रु. |
| ३. संत वाङ्मयाची सामाजिक फलश्रुति ले. प्रा. गं. बा. सरदार .... | मूल्य २ | रु. |
| ४. वाङ्मयीन समालोचन ( १९४७ ) | मूल्य २ | रु. |
| ५. शुद्धलेखननियम .... | मूल्य २ | आ. |
| ६. वाङ्मयीन वाद ( परिषद्–पुरस्कृत ) | मूल्य ३ | रु. |
| ७. प्राचीन पद्यग्रंथ ( प्राज्ञ परीक्षेस लावलेले ) | मूल्य २॥ | रु. |
| ८. निबंधविकास ( प्राज्ञ परीक्षेस लावलेले ) | मूल्य २ | रु. |
| ९. साहित्यसुगंध ( प्रवेश परीक्षेस लावलेले ) | मूल्य २ | रु. |

क्र. ७, ८ व ९ हीं पुस्तकें सोडून इतर पुस्तकें सभासदांस सवलतीच्या दराने मिळतील. ( टपालखर्च वेगळा )

मागणीस्थळ:—चिटणीस, म. सा. परिषद्, टिळक रस्ता, पुणें २.

* * *

## महाराष्ट्र साहित्य परिषद्, पुणें २.

कार्यालयाच्या वेळा :

सकाळीं — ८ ते १० व दुपारीं — ४ ते ८.

दर मंगळवारीं सुट्टी.

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास


महाराष्ट्र साहित्य परिषद

महाराष्ट्र साहित्य परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

संपादक

या. रा. ढवळे

वर्ष ३० : अंक ११९

ऑक्टोबर – नोव्हेंबर – डिसेंबर १९५६

या अंकांत

प्रा. कृ. पां कुलकर्णी, डॉ. चैतन्य देसाई, प्रा. सुरेश डोळके, डॉ. शं. गो. तुळपुळे, डॉ. ना. ग. जोशी, श्री. य. न. केळकर, प्रा. ग. प्र. प्रधान, श्री. सदानंद रेगे, प्रा. चंद्रकुमार डांगे. कै. दाजी नागेश आपटे (श्रद्धांजलि)—खास लेख. शिवाय संपादकीय, परिषद्-वार्ता साभार-स्वीकार इत्यादि.

अनुक्रमणिका



मुद्रकः—म. ना. चापेकर, आर्यसंस्कृति मुद्रणालय, १९८/१७ सदाशिव, पुणें २.
प्रकाशकः—अरविन्द मंगरूळकर, चिटणीस, महाराष्ट्र-साहित्य-परिषद, टिळक-रस्ता पुणें २.